# बहुरूपीसंतखेळ

अथवा

# भजनी भारूडसंग्रह.

( ह्या पुस्तकांत तुकाराम, ज्ञानदेव आणि एकनाथस्वामी इत्यादि साधुसंतांनीं केलेल्या चुटकेदार कवितांचा संग्रह केला आहे. )

हें पुस्तक

**गोविंद मोरोबा कार्लेकर**

यांजपासून हक्क विकत घेउन

**बाळकृष्ण लक्ष्मण पाठक यांनीं**

मुंबईयेथें

जगदीश्वर छा० छा०

शके १८१६ सन १८९४

किंमत ८ आणे.

# अनुक्रमणिका.

# बहुरूपी संतखेळ.

आणि

# भजनीभारूड संग्रह.

## अर्जदास्त.

अर्जदास्त ॥ अर्जदार ॥ बंदगी बंदेनवाज ॥ अलेकं सलाम ॥ साहेबाचे शेवेशीं ॥ बंदे शरीराकार ॥ जिवाजी शेखदार ॥ बुधाजी कारकून ॥ प्रगणें शरीराबाद ॥ किल्ले कायापुरी ॥ सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार झालों तो ॥ प्रगणें मजकुरीं येऊन सरकार काम सुरू करावयास लागलों तो प्रगणें मजकुरचे जमेदार ॥ दंभाजी शेटे व कामाजी महाजन व मनीराम देशमुख व ममताई देशपांडी व क्रोधाजी नाईकवाडी ॥ ऐसे हरामजादे फार आहेत ॥ सरकार कामाचा कयासा चालूं देत नाहींत ॥ दंभाजी शेट्या कचेरीस येऊन जोम धरून बसतो ॥ मनीराम देशमुख आपलें परभारें काम करून घेतो. ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जरदस्त केला. क्रोधाजी नाईकवाडी यानें तमाम तफरका केला. तो साहेबांपासून जरासंद चोपदार आला. त्यानें खबर केली

कीं मागून यमाजीपंताची तलब होणार. त्यास त्या धास्तीनें तमाम प्रगणा वोस झाला. ॥ बितपशील कलम ॥ डोऋसवाडीस मात्र कांहीं रुई झुई वस्ती राहिली. कानगांव तो बंद झाले. दोन्ही वेशींचीं कवाडें लागलीं. नाकापुरास वाहाव सुटलें. तोंडापुर तो तफरका झालें. दंताळवाडी वोस पडली. दिवेलागणी देखील राहिली नाहीं. केंसगांवची पांढर झाली. शिरापुरचे लोक दरोबस्त थरांथरां कांपतात. हात गांव कसल्यानें जर्जर झाले. त्यांच्यानें आतां कांहीं लावणी होत नाहीं. पायगांवचीं मेटें बसलीं. ढोंपरीपुरची राहिली ॥ चरण गांव चाली सरली. गांडापूर वाहूं लागलें. लिंगस्थान भ्रष्ट झालें. उठूं पळूं लागलें. धीर धरवेना. ऐसी परगण्यांत कीर्ती बुडाली. यावर सरकार काम सुरू करीत होतों. तों यमाजी पंताची परवानगी आली कीं, हुजुर येणें. आपणास साहेबाचा आश्रय आहे. एका जनार्दनका बंदा. बंदगीरोशन होय हे अर्जदास्त ॥ १ ॥

## ताकीदपत्र.

ताकीदपत्र समस्त राजकार्यधुरंधर प्रगणें शरीराबाद. सुंमातैन लोली प्रवाहे. ताकीदपत्र दिलें कीं, कायापुरास जिवाजीनामें ग्रहस्थ कऊल देऊन देहगांवची वस्ती रक्षावया

निमित्त पाठविले आहेत. हरएकविशीं साहित्य करावें. मनाजीराव सुभेदार, बुधाजीपंत फडणीस व चित्ताजीपंत चिटणीस हे पदरीं थोर मनुष्य असतां अहंकारपंत सबनीस यांचे हवालीं सर्व देहगांवचा कारभार केला. त्याने धन्याचे घरचे मुत्सद्दी घरीं बसवून नवीन मुत्सद्दी व कामगार उभे केले, ते हे चांगले नव्हेत. विकल्पाजी महाजन व मोहाजी शेटे व कामाजी कोतवाल, क्रोधाजी नायकवाडी, द्वेषाजी जमेदार, अधिकार जासूद, लोभाजी पोतनीस, विकारपंत जकातदार, मत्सरजी मेहेत्र्या, कुतर्काजी गस्तवान्, उन्मत्त जी पाटील, कुबुद्धिपंत कुळकर्णी, भ्रमाजी शिपाई, मदाजी देशपांड्या, दंभाजी देशमुख, प्रपंचपंत मुजुमदार. मूर्खाजी हुजरे, स्वार्थाजी खिसमतगार, अविवेक पुराणीक, अज्ञान मशालजी, हे नवीन कामगार उभे केले व घरांतील पहिल्या दासी उभ्या केल्या त्याः—आशा, मनशा, तृष्णा, कल्पना, ममता, माया, प्रीति, भुली, भ्रांती, इच्छा, वासना, भ्रमणा, कुबुद्धी, निंदा, अहंता, चिंता, निद्रा, मोहनी, या कर्मकर्त्या वादी अहंकारपंत सबनीस यानें उभ्या केल्या. त्यानें दरोबस्त प्रगणा बुडविला. आणि यमाजीपंत कमाविसदार यांचे घरीं एकांतस्थळ स्थापन केलें. त्यावरून हें ताकीदपत्र सादर केलें. तें मुत्सद्दी व कामगार त्यागावे आणि सरकार हुजूरचे मुत्सद्दी कामगार

आहेत तर त्यांचे हातें काम घ्यावें. मुत्सदी तपशील–शुद्ध सत्वभाव, वैराग्य, विवेक, बोध, परमार्थ, आनंद, समाधान, निर्वैर, स्वानुभाव, धैर्य, सत्य, भजन, पूजन हे कारभारी आणि कार्यकर्त्या सुशीला, सुबुद्धी, उन्मनी, प्रतिष्ठा, नवविधा, मर्यादा, शांति, क्षमा, दया, नम्रता, समाधि ह्या कार्यकर्त्या. हे मुत्सदी यांचे हातीं काम घ्यावें. याजविषयीं सरकारांतून ताकीद झाली आहे. तर लिहिल्याप्रमाणें वहिवाट करावी. सबनीस मजकूर यांचे कामगार मुत्सदी दरम्यान या कामांत आल्यास पारिपत्य केलें जाईल, हें स्पष्ट समजावें. सरकार कामगार उभे करावे. याप्रमाणें वहिवाट करावी. एकाजनार्दनीं शरण हे आशिर्वाद हें ताकीदपत्र.

## अभयदान.

चिरंजीव जिवाजीपंत ठाणेदार यांशीं आत्मारामपंत कमाविसदार कसबे ब्रह्मपुरी. आशीर्वाद उपरी तुह्मांसि देहगांवचें ठाणें दिलें, तर ठाण्यांत सावधपणें वर्तणूक करणें. तेथें ममताई पाटलीण, तिणें लटकेंच दंभ केलें आहे. कामक्रोधादि षड्वैरी चाकर ठेवून लोभमोहाचे फांसे सिद्ध करून ठेविले आहेत; ह्मणून तुह्मांस सूचना मात्र लिहिली आहे. विषयाचा लोभ न धरणें. निजहितासीं अंतर न करणें. सत्य मिथ्या

जाणून विचाराची वाट धरणें. अविचारपणा सोडून देणें. विवेक सद्भावांशीं मित्रत्व विशेष असों देणें. त्यांचे बुद्धीनें गांवची लावणी करणें. उत्तम चारी वर्णांसी कऊल देऊन धैर्याचा नांगर धरून शेतांतील मदेखट्टे काढून वासनेच्या पालव्या तोडून संशयाचा काशा गोळा करून भूमिका शुद्ध करून मग भक्तिज्ञानवैराग्य तिफणी करून सद्गुरुमुखें निजबीज पेरणें ॥ तेथें शुद्धसत्वाचा मेघ वर्षला. तेथें सत्याचा माळा घालून कुतर्क पांखरूं उडवून देणें. जागोजागीं विश्वास रक्षण ठेवून शेतांतील माल अवघाचि गोळा करून षड्गुण ऐश्वर्य बैल जुंपून अवघाच माल खळ्यांत आणून कसमळ काढून स्वानंदाची रास करणें. तेथें सिद्धसाधक मागते येतील, त्यांला भक्तीचे पायलींत अवघाचि माल मोजून देऊन सह हुजूर ब्रह्मपुरीस येणें. सांगितल्या गोष्टींत बाकी ठेवाल तर चौऱ्यांशीं लक्ष योनी फिरणें लागेल, मग पुनरपि तुह्मांवर दहस्त लागेल; खरें चालावें जन्ममरणाची वाट खंडेल ॥ जनार्दनसद्गुरु कृपेचा सागर. ॥ तेणें एका जनार्दनीं आनंदमय समाधान झाला ॥ द्वैताचा लेश उरला नाहीं. सच्चिदानंद रूपप्रत्ययास येऊन समाधान पावलें.

## नीति.

सांडावरून जाऊं नये ॥ लांच खाऊं नये ॥ चोहाड्यांत राहूं

नये ॥ कोणीएक ॥ १ ॥ अक्रीत घेऊं नये ॥ इमानें सोडूं नये ॥ बैमान होऊं नये ॥ कोणीएक ॥ २ ॥ सज्जनाशीं विटूं नये ॥ नीचासवें बाटूं नये ॥ तस्कराशीं पुसूं नये ॥ कोणीएक ॥ ॥ ३ ॥ भक्तिमार्ग खंडूं नये ॥ कुभाड्यांशीं तंडूं नये ॥ खळासंगें भांडूं नये ॥ कोणीएक ॥४॥ सत्पुषाशीं छळूं नये ॥ शिवेचा गुंडा ढाळूं नये ॥ केला नेम टाळूं नये॥कोणीएक ॥५॥ सद्गुरु सेवा सोडूं नये॥ कुळधर्मासि मोडूं नये॥ पापद्रव्य जोडूं नये ॥ कोणी एक ॥६॥ संपत्ति आलिया माजूं नये ॥ अभिमानें फुगूं नये ॥ सभा देखून लाजूं नये ॥ कोणीएक ॥ ७ ॥ असत्यवाद करूं नये ॥ खोटा संग धरूं नये ॥ भोचकासि मैत्री करूं नये ॥ कोणीएक ॥ ८ ॥ भलतेभरीं पडूं नये ॥ कोणीएक ॥ ९ ॥ जन्मा-आलिया स्वभावें ॥ कांहीं सार्थक करावें ॥ ऐसें मनीं विचारावें ॥ कोणीएक ॥१०॥ एका जनार्दनीं भावें ॥ संतचरणीं लीन व्हावें ॥ सदां हरिनाम उच्चारावें ॥ कोणीएक ॥ ११ ॥

## ५ गारुडी.

आदिपुरुष निर्गुणनिराकारकी याद कर ॥ मेरे गुरुपरंपार-दिगारकी यादकर ॥ जिनें माया अजब्बनाई उस वस्ता-दकी यादकर ॥ गैबी खजीना हमणा दिया उस साहेबकी यादकर ॥ संतमहंतकी यादकर ॥ गुणीगुणवंतकी यादकर ॥

श्रीभगवंतकी यादकर ॥ जोगजुगनका बांधा तोडा शमदम-का सिरपर संबला छोडा ॥ समता सोहि सुहावे तुरा ॥ गुरु गा-रुडीबीरपुरा ॥ नैवं वीरकी पैन्ही मुद्रा ॥ कान फाडके खाये निद्रा ॥ अनुहात धुनुकु मुख बजावे ॥ नागसूर धनुगर्जे चल चल चल निरंजन जल जंगलके जिवडे ॥ खेलना होयसो उलटदृष्टिसों खेल ॥ आबी करूंगा फैल तेरी मुंढी काटूंगा ॥ सापसे भुले बिच्छु किडे परपंचकोटि परमों आनकर पडे ॥ बडे बडे जनावर पाले हारे ॥ लाले, जरदे, उजले, काले, पीले, भलावे भला ॥ अभिमानजी बडे झुठ मुठ विण चुलटे नाहीं ॥ कहु तो ब्रह्मांडकाटने दोरे ॥ देखो मियां हाय हाय ॥ डंख मा-रावे डंखमारा ॥ सो बडे बडे सो नहीं उतारा ॥ जदगुरुग्या-नका लगाया मोहरा ॥ जहर उतारा मीया बाजीगारी वीद्या खेल ॥ हंडीबाग बडा अलबेला ॥ हात हलावे पाय हलावे ॥ भाले भोले लोक भुलावे ॥ आवे हंडीबाग ॥ बाप बडा क्या बेटा बडा ॥ बेटे आगे बाप खडा ॥ गुरु बडा क्या चेला बडा ॥ चेले आगे गुरु खडा ॥ चेला तो प्रेम महेलपर चढा ॥ धनी बडा क्या चाकर बडा ॥ चाकर आगे धनी खडा ॥ सास-बडी क्या वहु बडी ॥ वहु आगे सास खडी ॥ बीबी बडी क्या बांदी बडी ॥ बांदी आगे बीबी खडी ॥ निराधारको लेके छ-डी ॥ बीबी खसमके छातीपर चढी ॥ तै बडा क्या मैं बडा॥मेरे

आगे तै खडा ॥ तै नहीं अलम छायही ॥ ग्यानीकूं ग्यानल-गाऊं लोभेकूं अंधेकूं उडाऊं ॥ फूक मारु तो जाजाजाजा ॥ बो-धके पहाडपर जावेजा हां आना नहीं जाना नहीं तहां जा-मेरे सद्गुरु दाताकी इत्तीसी लकरी मूलमंतर हातमोंपकर ॥ जिदर दवरा उदरदवरी फेर देखि तो मेरी मेरे सात ॥ अबी-करूंगा खबूतरका तमासा ॥ बिनपर उडताहै खासा ॥ देखे तो अविवेके खलीतेमें घुसा ॥ तो बाहेर कैसा आवेगा ॥ आवबे आव बाहेर आव ॥ जिसे नहीं हात ना पाव ॥ जिसे नहिंगांव-नाठाव ॥ जिसे नहीं रूप रेखा ना भाव ॥ ना कछु नहीं ॥ धी-रीधीरी तरी बीजमंतर खोल ॥ लिंगदेहकी गांठ खोल ॥ एक बार ऐसा खेल खेलूं ॥ सोमें बडे बडे खेलेथे ॥ हा तो येक एके दोन दोके तीन, तीनके चार, चारके पांच, पांचके पचीस पचीसके छत्तीस, छत्तीसका येक, येकबी नहो तहां एका ज-नार्दन देव ॥ १ ॥

## ६ शकुन.

निर्गुणनिराकार दादा माहुर माझें गांव ॥ शकुन सांगावया आलें येमाई माझें नांव ॥ तये नगरीं वस्ती केली मीतरि आलें एक भावें ॥ ऐसा माझा शकुन दादा चित्त देउन ऐ-कावें ॥ १ ॥ कैकाय कैकाय दुरील माझा देश ॥ शकुन सां-

गावया आले कलियुगास ॥ ब्रह्मा विष्णु महेश पुसती शकुन-
आह्मास ॥ ऐसें निदान आह्मी सांगितलें त्यांस ॥ २ ॥ ध-
रित्री आकाश मज देखतां उत्पत्ती ॥ चंद्र सूर्य मज देखतां
दादा होती ॥ ब्रह्मा विष्णु महेश मज देखतां उपजती ॥ जेथें
आहे शिव तेथें आदिशक्ती ॥ ३ ॥ दाही अवतार मज देखतां
झाले ॥ अकराहीरुद्र दादा होउनियां गेले ॥ ऋषी मुनी गंधर्व
मज देखतांचि झाले ॥ ब्रह्मा विष्णु महेश मज देखत निमाले ॥
॥ ४ ॥ अठ्ठावीस युगें झालीं चक्रवर्ती ॥ कौरव पांडव
गेले दादा बहु नेणों किती ॥ छपन्नकोटि यादव गेले
कोणे पंथीं तुह्मी ॥ आह्मी जाऊं मागें कोणी न राहती ॥
॥ ५ ॥ पृथ्वीमध्यें दादा येक विपरीत होईल ॥ बहीण
भावा दोघांजणा विवाह लागेल ॥ पांचा वरुषांची बाळा
भ्रतार मागेल ॥ सहा वरुषांची नारी गर्भिण होईल ॥ ६ ॥
आणिक एक दादा माझा ऐकावा बोल ॥ पृथ्वी वरुता वारा
थोर झुंझाट सुटेल ॥ थोर थोर दादा पर्वत उडोनि जातील ॥
अठराही जाती एके ठिकाणीं जेवतील ॥ ७ ॥ कलियुगाची
दादा ऐकावी थोरी ॥ पुत्र होइल पित्याचा वैरी ॥ भ्रतारा
सोडोनि घरोघरीं फिरतील नारी ॥ ऐसा माझा शकुन दादा
आइका निर्धारीं ॥ ८ ॥ आणिक एक दादा माझें आयका उ-
त्तर ॥ आकार जाईल अवघा होइल निराकार ॥ जावी चंद्र सूर्य

मग पडेल अंधार ॥ धरित्री आकाश जाइल मग कैंचा दिनकर ॥९॥ आणिक एक शकुन माझा आयकावा संतीं ॥ तुह्मीं मूळपीठीं राहणें नांव माझें आदिशक्ती ॥ अंबेचा व्यवहार आहे आहे आदिमूर्ती ॥ एकाजनार्दनीं प्रसन्न झाली आदिशक्ती ॥ १० ॥

## ७ दिवटा.

जागे जागे या वाडियामध्यें जागे ॥ या वाडिया बाहेर जागे ॥ कितीएक तळमळ करीत गेले ॥ हेंचि खिडाराचें खिडार ॥ कोण्यागृहस्थाच्या पोटा ॥ कोणा सदेवांचा वांटा ॥ लौकरी काढा बैसावया घोडा ॥ करी या शब्दाचा आडामोडा ॥ तरीच लेंकराचा खेळ कीं राया ॥ १ ॥ पैल लंकेचा चोहटा ॥ मी वाईट बोलिलों दिवटा ॥ तो रांडेचा रावण मेला ॥ ह्मणे हा दिवटा खोटा ॥ राक्षसावानीच बोले तेव्हां ॥ राम अवतरला येकचि खांडे ॥ दाहा शिरांची मुंडें ॥ विसां भुजाची खांडें॥त्या लंके पुढें घोष मांडिले ॥ हैलगे गांव्याळीचे द्वारीं ॥ दांत इचकुशानें कुथाईली ॥ २ ॥ आनखिन त्या बायकोनच्या छंदें ॥ त्या हिरण्यकशिपाला फुटला फांटा ॥ तो ह्मणे हा दिवटा खोटा ॥ इतक्यामध्यें नरसो ब्राह्मण अवतरला ॥ डोळे फिरवी गरगरां ॥ दांत खाय करकरां ॥ कोंभाचिक चकावला ॥ रौसा चक चकावला ॥ हालगे गांव्याळिचे द्वारीं ॥ देदान मज

दिवस्याला ॥ नाहींतरी नागवसी या बोलाला ॥ आन-स्वीन दान दे गाविंच्या जोशाला ॥ ३ ॥ तेणें विघ्न टळेल मन पाच कनकीचा दिवा मध्यमनपाक घृत सोळा हातपावाचा पासोडा ॥ दीड तोळा सोन्याचा माकोडा ॥ ऐसें द्यावया दान एक दाता जनार्दन ॥ इतर लंडी कायदेऊं जाणें ॥ ज्याला आळु कृपणविषयाचे ॥ एकाजनार्दनाचा दिवटा भक्तीच्या व-सविल्या पेठा ॥ सायुज्यताची नरदेहीं ॥ ४ ॥

## ८ बाजेगारी.

संसार बाजेगारी लेख ॥ दुरलग अंदेशाकार देख ॥ जो कुच होना सो कदा न चुके ॥ वल्ले वस्तादकी पद नामी ॥ आखर जमानी ॥ यादिनके बुरे हाल होवेंगे ॥ दुनयामें बडा बडा तमासा ॥ बडे बडे हुन्नेर लगे ॥ विद्या अविद्या बोल नायेक ॥ वल्ले वर्णुके अनेक ॥ इस काममें बडे बाजी जिसकूं अंत न पाया ॥१॥ अरे देख देख देख ॥ पीरपैगंबर आवलीया ॥सैदसा-दात विषयाकुसटे वासनाउटना हाटे ॥ अरे देख देख देख ॥ दौड दौड दौड ॥ जबलग उजाला तबलग दौड ॥ अंधेरा पडेगा पीछै कछु नाचले ॥ आपसू आपवाजी नदे ॥ बुरेसद देना धंदे ॥ हरिदासके प्यारे ॥ रघुनाथके बंदे ॥ कह्या न भावें ॥ फाडफाड खावे वांदरासे रानहुवे ॥ २ ॥ तमासा देखत

आलमखुषहुवे ॥ दिसवांदरांरजा पाले ॥ तो मुकेचनाबाहेर मले॥ नाना विषयवासना बाहरमेंले ॥ उठेउठे बैठे लेटे लेटे ॥ कहुतो चुकाचि लेटे ॥ दिल बांदराज्यातलब बाजेगारी येही खेल तो मेरा नामकी हाहै ॥ अजबबाता ॥ अव्वलमुजे नामचि नथा ॥ दारम्यान में पैदाहुवा सलखन सुखादबेठा ॥ वाहमुथी उठानाठा ॥ ३ ॥ उसथे बैठा निरखणका मार चैलाया ॥ सलखन उसदेखती सलखन ॥ बडेमहाजनद्वारीं ॥ कहने लगे सलखनका तमासादेख ॥ बसेले मुजे नील खनका तमासा देखना ॥ जहाहा हाहो ॥ अब बेबेबे अललल ॥ अततत बोहीहा बोहीहा वो ॥ जोरहै जोरहै जोरहै ॥ लढेगा लढेगा लढेगा ॥ लढेगा सो पडेगा पडेगा ॥ पडेगा सो चढेगा ॥ हुशारभाई हुशार ॥ भीतरसे हुशारसो सुखी ॥ बाहेरीसे हुशारी तो बहु हुशारी ॥ ४ ॥ गुरु बडा क्या चेला बडा ॥ बापबडा क्या बेटा बडा ॥ बुढा बडा क्या जवान बडा ॥ जवान बडा कुतितक वाचावटी चढी ॥ उदभोकु भोकाने ॥ गुरुबडा क्या चेला बडा ॥ चेला बडा तो चेलाबडा ॥ तो चेला भोवंडेपनामें पडा ॥ गुरुके बढाईसे चेला बडा ॥ बापबडा क्या बेटा बडा ॥ तो बाप नाम बेटा धरे बेठिचाकरी बापचाकरे बापके शिरपर बेटा चढे ॥ उसबदल बडेमना घडे ॥ जवान बढा या बुढा बडा ॥ बुढा जागेहै मरे जाय ॥ जिवना बहुत तवाना

होय ॥ बुडा पडे जवाना चढे ॥ इस बदलबठेपनामें पडे ॥५॥
नजरकर नजरकर नजरकर ॥ यार हो नजरकर जनरकरेगा
सो जितेगा ॥ नजर करेगा सो हरेगा ॥ हार या देना जिता
लेना ॥ हुशार भाई हुशार ॥ हुशार होकर संभालमें कैसी
चोंधील्या उंगा ॥ मैने भल्या भल्याकुं चोंधी दिया ॥ मेंने
बडेबडेकूं वेड लगाया ॥ देखदेख तमासा मेरा ॥ मेंबी
भांडीकू चोंधी दिया ॥ बोमृगीके चोंधनें ल्याया ॥ ऋषी
शृंगीकूं चोंधी दिया ॥ वो नाचनीको दुमाल ल्याला ॥ ६ ॥
वो पाराशरकूं चोंधी दिया ॥ वो दुर्गंधाके ख्याल ल्याया ॥ येक
घडीमें तप गमाया ॥ दुर्गंधासो सुगंधा किया ॥ उसके
जगामें व्यास निफजीया ॥ वो महादेवकूंबी चोंधी दिया ॥
वो मोहोनीके दुमाल ल्याया ॥ ब्रह्माकूंबी चोंधी दिया ॥
वो अपनें बेटीकूं ख्याल लगाया ॥ मना कर्ता याद न पाया ॥
सारस्वतकूं हैया लहवा ॥ तुमारो विष्णुकूंबी चोंधी दिया ॥
यो वृंदाके स्मशानमें लीठाया ॥ वो नादरकूंबी चोंधी दिया ॥
वो पलखम्यानें नारदी किया ॥ अंघुलकरत पेट बढाया ॥
साठबेटेका हुकुम जनाया ॥ वो तुमारे असल देवजीसि नाम-
रूप नहीं उसे बडे देवकूंबी चोंधी दिया ॥ आधी औरत आधा
मरद किया ॥ आपसो आपसो बतलाया ॥ ७ ॥ रहे रहे र-
हेचि परीके रहे जा ॥ आपने जगोमें रहेजा ॥ जगा छोडकर

जा ॥ न जावेगा तो ये मार मारूं ॥ मारते मारते मारले-डांगोरो ॥ उपरयिळकुटेगादात निकसकर पसरेगा ॥ डांगा तुमके पेटकूं जावेगा ॥ इसबदल गूमरपना दूरकर ॥ मौ-जदकूं यादधर ॥ धरेगा सो ऐसी धर ॥ विषयाकूं मुसल्म वीसर ॥ देख देख देख ॥ लढूं नको लढूं नको लढूं नको ॥ चौंधीकी जगा लढूं नको ॥ वाहालीज्या पडूं नको ॥ उसज-गालीड पडेगा ॥ ८ ॥ तोमरगतकी सीर चढेगा ॥ तो काल-का फांसा पडेगा ॥ वो तुजेकै चिप छोडेगा ॥ इसबदल विष-याकूं लढूं नको ॥ हमारा दाता कुच देता नहीं ॥ इसबदल हामेकूं विषयाकूं लढत है ॥ वाहा बडे बडे जन राजद्वारीं बैठे हैं ॥ कुछ देनासो आज देनाका दीन है ॥ दिल चाहा सो देवो ॥ कुछ मर्थीनाम बोले ॥ दिलकी गांठ खोले ॥ आखबतकूं काम आवेगा ॥ उस खैरात पर हात चले चीप बैठे मुंडी हा-लवे कुच काम नहीं जाहासो दिल देवेंगे तो निजमोजकूं पावेगे ॥ ९ ॥ सुखशांति सुखेच्छावेगें ॥ भीरतिके तिमेवे खावेगे ॥ बड्या बड्याकी बोले बढाई ॥ ऐसा कुच देवोना ॥ चीप बैठे मुंडी हालावे कुच काम नहीं ॥ ऐसा कुच देवो जो खाते पीते भेर भेरया सो कबहु नासेरे ॥ पोंगड्याढींगळ्या कुरवानापुरे ॥ सबलिया जम कुबसकर ॥ ऐसा कुच देवोना येक्या देवेगे विचारे ॥ इतलादिया भीक मंगनेकूं गया ॥ उ-

सथी दौलत कहांकी है लेंठीनें लिया ॥ इगानपरदुगानि दुगानिपर तिगानि ॥ जिसके तिसरे घर दुगानी परतीरुका येक देवेंगे बिचारे ॥ तो भरे दाते कैसेहैं ॥ हसारातशा देखना तो हमारा कुचलेना ॥ हमकूं कुच दिल देना ॥ येतो बहुत मुस्कल है हमणा ॥ देना नहीं भोजराजा देषक नहीं ॥ विक्रम देषक नहीं ॥ इंद्रदेसका नहीं ॥ कुबेर देसका इतना देव तो पेटभराभरलेवे ॥ येक्यादेवेंगे बिचारी ॥ ॥ १० ॥ तो मेरे दाता कैसाहै ॥ दिलदर्यावमों व्हजुदभर्याव ॥ उने अपना कर धर्याव ॥ उनके संतकथेमें मेराजीत खचलता उन्हेथीमें राजेनावाक उसखेलता ॥ उन्हेथीमें राजीव जीवता ॥ उनकूं मंगना क्याबानाता ॥ काटसक्या नजर करो नजरकरो थाईहो नजर करो ॥ नजर करेगा जीतेगा ॥ नजरकरेगा सोहारेगा ॥ हारया देना जीता लेना ॥ आव्वल एक एके दो, दोके तीन तीनके पांच पांचके पचीस गाफल कहते दसबारा पंधरावीस ॥ बल्ले सही जान पांचके पचीस ॥ बादीका साशकिया ॥ भल्या भल्याकूं बडे बडेकूं उन्हेल्याई माया ॥ विनलढेयाउने जगत्र भुलाया ॥११॥ गाफल कहे ते मेरीमाया ॥ गुरुका बोध ऐसा पाया ॥ ऐसी हा मारी झाती गाये ॥ वो क्रोधबागकूं खाये ॥ अहंकार साफल देना चढे मुवा जैसा चिपकाची पडे ॥ परकाखबूतर खबूतर कामींपरवो बाता सदहि

दूरकर ॥ पंख बीन ऐक हंसकीया ॥ उडै चढेविनसत्य लोककूं गया ॥ सनकादिककी काढी माया ॥ मुख्य मूळ ब्रह्मा हुशार किया ॥ उन्हेहंसनें बडा तमासा किया ॥ ब्रह्मासनथी मूंड मुंडाया ॥ आपेभी वावाहा छपी खाया ॥ हुशारदेखे तो नजीकवि पाया ॥ एकमों अनेक अनेकमों येक ॥ येही देखनामें हुशारीमें देखवाहा नहींदेखना दुखयेही खेल खेल तैसमाधि सुख ॥ एका जनार्दनीं जगसमस्त इसबाजीमें भिस्त दस्त ॥ देखें फेरितो आजब वात पैगंबर कहै ॥ सदरहामत येही तमासा ॥ सिद्ध देखे ॥ जो देखे सो जुदा नहीं देखे ॥ एकाजनार्दनीं बेसक बाजेगारी एन ऱ्हक ॥ ३२ ॥

## ९ सरोदा.

डुगडुगडुगडुगोनि जाणे ब्रह्मयुग ॥ अहो त्या अहंममतेच्या पोटीं ॥ नका कीजी धाऊं ॥ १ ॥ अहो त्या अहं ममतेच्या पोटीं ॥ संभवल्या ब्रह्मांडकोटी ॥ त्यांची समूळ सांगेन गोष्टी ॥ माझे सरवद्याचें वचन ॥ एकाकीं जी राजानो ॥ २ ॥ मी निजानंदपुरींचा रहिवासी ॥ धांवोनि आलों तुह्मा संतांपासीं ॥ शकुन सांगावया परियेसीं ॥ ऐका श्रवणेसी सावध राजानो ॥ ३ ॥ मी जें बोलणें तें बोल ॥ तें समुद्रापरीस खोल ॥ धरी अबोलणें तें बोल ॥ इंद्रियीं बोल असूंचा ॥ ४ ॥ आतां

सांगतों येक शकुन ॥ सर्वांगाचे करूनि कान ॥ श्रोतीं व्हावें सावधान ॥ निजात्मखुण पावोनी ॥ ५ ॥ मुळींची जे स्फुरली अहंता ॥ ब्रह्मींची सांगेन समूळ वार्ता ॥ अव्यक्ती झाली तत्वता ॥ माया नित्य तया नांव ॥ ६ ॥ अहो त्या मायेचिया कुशीं ॥ उत्पत्ती झाली त्रिगुणासी ॥ तेंचि ये अकार उकार मकारासीं ॥ अर्धमात्रेसी ओंकार ॥७॥ अकार भूमिका विक्षेपता ॥ उकारीं जाण गतायाता ॥ मकारीं सुलीनता ॥ सुलीन अर्धमात्रीं ॥ ८ ॥ अकारीं रजोगुणाची वस्ती ॥ उकारीं तैजस ह्मणती ॥ मकारीं प्रज्ञा अभिमानी बोलती ॥ प्रत्यगात्म्याची वस्ती अर्धमात्राची ॥ ९ ॥ अकार तो ऋग्वेद जाण ॥ उकार यजुर्वेद प्रमाण ॥ मकारीं सामवेद वोळखण ॥ अथर्वण जाण अर्धमात्रीं ॥ १० ॥ ऐसा हा ओंकार ॥ विस्तार सांगितला सविस्तर ॥ जाणोनि अर्थसार ॥ सुखी सुखरूप असावें ॥ ११ ॥ आतां सांगतों येक शकुन बरा ॥ कांहीं मज सरवद्यास दान करा ॥ दान कराल तरी सोय धरा ॥ चौऱ्यांशीं लक्ष फेरा नयाल कीं जी राजानों ॥ १२ ॥ कल्पनेचें काळें चिरगुट ॥ मीपणाची बांधोनि मोट ॥ विषय वासनेची सोडोनि गांठ ॥ कांहीं दान श्रेष्ठ मजकरा ॥ १३ ॥ आकाशाची घेऊनि वाटी ॥ त्रिगुण तेल भरूनि ताटीं ॥ दान करितां उठाउठी ॥ वोखटी पीडा टळेल कीं जी राजानों ॥ १४ ॥ म्यां शकुन सांगितला

जनकराया प्रती ॥ त्याची कैशी झाली देहस्थिती ॥ देहींच असोनि विदेही प्राप्ती ॥ या शकुनाचे कीं जे राजानों ॥१५॥ आणखी ऋषेश्वर थोरथोर ॥ वसिष्ठादि विश्वामित्र ॥ सनकादिक पाराशर ॥ याच विचारें नांदलें कीं राजानों ॥ १६ ॥ आणखीं संत महंतादि पती ॥ याच विचारें नांदले किती ॥ अल्पही करितां त्यांची संगती ॥ नपावे जन्ममृत्युची गती कीं जी राजानों ॥१७॥ निवृत्ति सोपान ज्ञानदेव ॥ ते नांदले याच वैभवें ॥ खेचर विसोबा नामदेव ॥ चांगा वटेश्वर कींजी राजानों ॥ ॥ १८ ॥ परसा भागवत गोराकुंभार ॥ चोखामेळा महार रोहिदास चांभार ॥ जुल्हाई कबीर करिती विचार ॥ शकुनाचेनी राजानों ॥ १९ ॥ आजि येक बायकोचा संग खोटा ॥ इनें भुलविलें श्रेष्ठश्रेष्ठां ॥ थोर पडिले आव्हाटा ॥ भुलले वाटा स्वहिताच्या कीं राजानों ॥ २० ॥ जो कां सृष्टीकरिता चतुरानन ॥ इचा पदर लागतांचि जाण ॥ स्वकन्येशीं देखुनी आपण ॥ तोंही जाण वेडावला ॥ २१ ॥ जो कां विष्णु सृष्टि पाळिता ॥ त्याची कैशी झाली अवस्था ॥ तोही झाला लोळता ॥ वृंदेच्या स्मशानीं कीं जी राजानों ॥ २२ ॥ जो का श्रेष्ठ ईश्वर ॥ तोही झाला मोहिनीचा किंकर ॥ या बायकोचा पदर ॥ लागतां हरिहर ब्रह्मा वेडे जाहले ॥ २३ ॥ याकरितां संग नका धरूं इचा ॥ बोल ऐका मज खरवद्याचा ॥ माझिया बोला

विश्वासाचा ॥ तो परब्रह्मींचा रहिवासी कीं राजानों ॥ २४ ॥ डाकुलता झाला चालता ॥ परंतु नये बोलाविता ॥ निर्मळ नदी वास्तव्यता ॥ झाला डाकुलता कीं जी राजानों ॥ २५ ॥ एका जनार्दनाचा एकुलता एका ॥ शकुन गांठीं बांधिले देखा ॥ तेव्हां साधिली सत्वभूमिका ॥ परमार्थ फुका हाता आला ॥ २६ ॥

## १० वैंदु.

श्रीकृष्ण मायाजी पाहे ॥ ते मी झालें कईकाये ॥ कईकाय देवाचें अंग ॥ कईकाय झालें जग ॥ कर्म ब्रह्मरे विभाग ॥ त्यापासोनी कळों आम्या ॥ १ ॥ गोरी आई ओ आम्या ॥ सावळाई ओ आम्या ॥ बरव्या नामाची आम्या ॥ बरव्या रूपाची ओ आम्या ॥ शूळ गुळाई ओ आम्या ॥२॥ मत्सवाई ओ कत्साईवो ॥ वाराइवो नरसाइवो ॥ वामनाइवो ठेंगणाईवो ॥ परसाइवो ॥ रामाइवो ॥ ३ ॥ कृष्णाईवो बोधाईवो ॥ काळकाईवो आम्याभाईवो ॥ रेणुकाईवो गडबडाईवो ॥ चांगुणाईवो तुकाईवो आम्या ॥ ४ ॥ काय तुझ्या भयाचें साद पाहे ॥ सांगणें बोलणें नचले वो माये ॥ तुझ्या जीविंचें सांगेन ॥ तूं ज्या पुससील तें सांगेन ॥ तुझ्या मनींचें सांगेन ॥ जें सप्त-पाताळा खालीं ते तूंच तुजमाजी ॥ तेंच मजमाजी काय धमक घेऊन बसलीसे गे धमकटी ॥ तुझ्या धन्याची आस

करीन ॥ कीं कांकणाची चाड धरीन ॥ थुः तुझ्या तोंडावरी ॥ थुः तुझ्या लोभावरी ॥ शकुन सांगेन तें एक ॥ काळीं याई वो आम्या ॥ ५ ॥ मागु त्या तुरुगुंडा ॥ मागु त्या बुरगुंडा ॥ नीट केल्या बहुत राडां ॥ तैसी नव्हे मी कईकाये ॥ निज ज्ञान करंडा ॥ काळीकाईवो आम्या ॥ ६ ॥ नमो कानडी भाषा ॥ केळीव शीवशीघ्रशा ॥ शकुन केळी शकुन केळीसा ॥ इयो नमो आर ॥ सीडबीड आशा ॥ बीड ह्याळ्यावा ॥ गन्मोड होऊं गे आम्या ॥ ७ ॥ गंधिनें धन्नानेतमिन्ने ॥ गवीनें हाड व्याण ॥ आडव्याडामोहाषाईतुडा ॥ काळा आईवो आम्या ॥ ८ ॥ नमो तेलंग दिशा ॥ मच्छमच्छभाषा ॥ सगबेमुसल्ललोपे आम्या ॥ ९ ॥ मीचित्तउनाळु ॥ कइयाळु ॥ नइयाळु ॥ खखठाये ॥ काळी आइवो आम्या ॥ १० ॥ कईकाय कईकाय ॥ शकुन सांगेन तें ऐक ॥ कईकाये कईकाये ॥ नकळे ब्रह्मादिका ॥ कईकाय वृत्ती खोटी ॥ कईकाय कईकाय ॥ सत्य सांगेन गोष्टी ॥ जीवशीवा पडली मिठी ॥ एका जनार्दनाच्या कोटीं ॥ काई आई वो आम्या ॥ ११ ॥

## ११ छापा.

अजब है त्रिकूटका घाट ॥ जोत लगी घनदाट ॥ धुंडलेना औही बात ॥ पलख जोत लगी ॥ १ ॥ उडावत चवरंग गुलाल॥

झमक रहे जोतही लाल ॥ महाकारण महाल ॥ बिचले लाल चमकत है ॥ २ ॥ चमक लगी दीनरात ॥ नहीं कछु आदि अंत ॥ समजलेना औही बात ॥ सहज संत बतावे ॥ ३ ॥ खिजमत करले कछु काम ॥ आजमत पावोंगे राम ॥ भ्रमर गुंफामें राम ॥ रामनाम सुमरले ॥ ४ ॥ सुमरलेना नहिंमंत्र ॥ छांड दे सब तंत्र ॥ अनुहात जंत्र ॥ धिमक मृदंग बजावे ॥ ५॥ बजावे घनघनघन स्वरकावीन ॥ भजन करलेसंगीन ॥ नय-न जागे रातदिन ॥ ब्रह्म ताल लगावे ॥ ६ ॥ लगावे तो है तयार ॥ करले दीलमों करार ॥ होजा भवजल पार ॥ मेरे सद्गुरु साहेबकी ॥ ७ ॥ साहेब सद्गुरु गोपाळ ॥ गोपाळके प्रतिपाळ ॥ गोपाळ भट तुह्मारे ॥ फिकीरीमें रहता है ॥ ८ ॥

## १२ जोशी.

मी परात्पर जोशी ॥ होरा सांगेन संतसभेसी ॥ माझें वचन मानाल मानसीं ॥ तरी दृढनिश्चयेसीं परिसावें नाना ॥ ॥ १ ॥ ऐका ऐका राजेश्री ॥ प्रजा मोकदम कारभारी ॥ शेटे महाजन चौधरी ॥ बरवी नगरी वसविली नाना ॥ २ ॥ रा-होटकाटाचे दिवस आले ॥ जागे सांडोनी फेरे केले ॥ मार्गे कष्ट बहुत भोगिले ॥ शेवटीं फळ आलें नरदेहासीं नाना ॥ ३ ॥ या पांढरीस मार्गे बहुत आले ॥ जोशी भविष्य सांगोनि

गेले ॥ त्यांचें तुह्मीं नाहीं ऐकिलें ॥ दगे झाले थोरथोर नाना ॥ ४ ॥ काळाचे फेरे होऊन गेले ॥ थोर नगरांचे संहार झाले ॥ साच बोले माझ्या बोलें ॥ जोडी केली आत्मयुक्ती नाना ॥ ५ ॥ धेडा मांगांच्या मान्यता झाल्या ॥ उत्तम योनी भिकेस लागल्या ॥ ते ऐका मज जोशाच्या बोला ॥ उत्तम ते पडले अधमघरीं नाना ॥ ६ ॥ नांव काय पाटिलबुवाचें ॥ पुढील भविष्य सागेन सांचें ॥ वचन ऐका मज जोशाचें ॥ तेणें तुझें समाधान होईल नाना ॥ ७ ॥ एका बायकोची संगत घडली ॥ तेणें तुझी महिमा बुडाली ॥ जुनी भाकर सरोनि गेली ॥ गांठ पडली दरिद्राची नाना ॥ ८ ॥ तिचा संग टाकीं दादा ॥ बरवा चालेल तुझा धंदा ॥ साच मानीं माझ्या शब्दा ॥ सदा सर्वदा सुखी होसी नाना ॥ ९ ॥ नांव काय आवाजीचें ॥ कल्याण होईल बयाचें ॥ पुढील भविष्य सांगेन साचें ॥ तरी तुझें तेणें समाधान होईल बये ॥ १० ॥ बया आणिक एक सांगतों मात ॥ टाक कुबुद्धी पाहूं देहांत ॥ फार बरेपणा दोघांत ॥ स्त्रीपुरुषांत बहु गोडी बये ॥ ११ ॥ विघ्न दिसतें वरले आळी ॥ नाहूं पाहती थोरथोर बळी ॥ पूर्वपुण्यें जाहली होळी ॥ फेरे पाळी चुके जागे बये ॥ १२ ॥ दहा लेंकुरें जाहली आई ॥ परि तूं एकाचें सुख देखिलें नाहीं ॥ आतां येथून पुढें पाहीं ॥ सुख होईल तें एक बये ॥ १३ ॥

एका लेंकीची सासुरवाडी ॥ अपार सुख देशील पुढी ॥ माझें वचन नको मानूं लबाडी ॥ सत्य तुजपुढें बोलतों बये ॥ ॥ १४ ॥ कुबुद्धीची कांचोळी ॥ लेऊं नको काळी चोळी ॥ दुष्टगत झाली सगळी ॥ ऐका नाम तुझें बये ॥ १५ ॥ विकल्प उडदांचा मेळवा ॥ द्वैत तांब्याचा पाऊड द्यावा ॥ स्नेहें तेलाचा घट भरावा ॥ वोंवाळून द्यावा मज जोशा कारणें बये ॥१६॥ विषमबुद्धीचे नाणें ॥ ओंवाळून द्यावें मज जोशा कारणें ॥ आपुलें निःशेष बरें करणें ॥ तरी दान करीं वेगेंसी बये ॥ ॥ १७ ॥ साच मानीं माझ्या बोला ॥ येथूनि तुझा शनिश्चर गेला ॥ जन्मगुरूचा पाटल झाला ॥ संग घडला साधुसंतांचा बये ॥ १८ ॥ पूर्ण जोशी जनार्दन ॥ सूर्यवंशीं रघुनंदन ॥ तयासी अनन्य जातां शरण ॥ वंश उद्धरण तयाचा ॥ १९ ॥

## १३ जोशी.

येथून पुढें बरें होईल ॥ भक्तिसुखें दोंद वाढेल ॥ फेराचौऱ्यांशींचा चुकेल ॥ धनमोकासी ॥ १ ॥ मी आलों रायाचा जोशी ॥ होरा ऐका दादानों ॥ ध्रु० ॥ मनाजी पाटील देहगांवचा ॥ विश्वास नका धरूं त्याचा ॥ घात करील नेमाचा ॥ पाडील फासीं ॥ २ ॥ मी वासना बायको शेजारीण ॥ झगडा कटील मोठी दारुण ॥ तिच्या पायीं न.गवण ॥ घरबुडविसी

॥ ३ ॥ मी एका जनार्दन कंगाल जोशी ॥ होरा सांगतों लोकांसी ॥ जा शरण सद्गुरूसी ॥ फेरा चुकवा चौऱ्याशींचा ॥ मी आलों रायाचा जोशी ॥ होरा ऐका दादानों होरा ऐका दादानों ॥ ५ ॥

## १४ जोहार.

आजि माय बाप करितों मी जोहार ॥ आलों एसकर सांगावया ॥ १ ॥ आजि मायबाप तुह्मी बाकी झाडा नाहींतरी खोडा घालूं ह्मणती ॥ २ ॥ फांकू नका कोणी रुजु झालीया वांचुनी ॥ सांगा कीं जी चला घर धन्या ॥ ३ तुका ह्मणे तुह्मी करूं नका बोली ॥ आखेरचे सालीं झाड घेती ॥ ४ ॥

## १५ जोहार.

जोहार पाटील बाजी ॥ चावडी चलानाकां जी ॥ ऐसें सांगत आलों आजी ॥ बाकी नका थकवूं कीं जी मायबाप ॥ १ ॥ कोपटामाजीं तळपती गाय ॥ हाडाची बेडी पडेल पाय ॥ तोंड चुकवित जाय ॥ मग वांचुनी काय कीजे माय बाप ॥ २ ॥ काढितां गांवचीं गुरें ॥ कां बुजवितां गांवचीं द्वारें ॥ गस्त पाठवा वरी त्वरें ॥ कांहीं उणें पुरें करूं नका कीजी मायबाप० ॥३॥ आंवदा आली देवाची पाळी ॥ तेव्हां तों

हेंच करतां काळीं ॥ चावडी चला हेच वेळीं ॥ शिव्या गाळी कांहीं घेऊं नका कीं जी मायबाप ॥ ४ ॥ कुळकर्णी आपुले स्वाधीन करा ॥ आड खर्चाचा ताळा धरा ॥ चित्त हरिनामीं धरा ॥ येईल मजुरा आस तत्व कीं जी मायबाप ॥ ५ ॥ विठु पाटलाचा माहार ॥ चोखामेळियाचा जोहार ॥ सकळ संतांचा कारभार ॥ मज नफराचे शिरीं कीं जी मायबाप ॥ ६ ॥

## १६ जोहार.

जोहार मायबाप जोहार ॥ तूं कोण गांवींचा महार ॥ पुसाल जरी समाचार॥ तरी सादर परिसा कीं जी मायबाप ॥१॥ माझा निराकार मुळींचा ठिकाणा ॥ भक्तासाठीं सोडिला जाणा ॥ वस्ती करूं कायापुरींच्या खुणा ॥ सांगेन कीं जी मायबाप ॥ २ ॥ आणि जोहार जी मायबाप जोहार ॥ मी पार्वतीचे गळयांतील हार ॥ ईश्वराचा पूर्ण भार ॥ त्याचा करितों कारभार ॥ मज नफराचे शिरीं कीं जी मायबाप ॥ ३ ॥ अखंडद्वारीं पडिला असतों ॥ प्रेमाचा तुकडा मागून खातों ॥ धन्याला दुवा देतों कीं जी मायबाप ॥ ४ ॥ तुह्मी मुळींचा ठाव सोडूंनका ॥ विसरल्यास पावाल धका ॥ अंतकाळीं कीं जी मायबाप ॥ ५ ॥ वस्ती भरूं आह्मी साचे ॥ समस्त कुळवाडी नगरींचे ॥ पैसे टाका धन्याचे ॥ बाकी थकवूं नका कीं

जी मायबाप ॥ ६ ॥ असामी वारा दिघली ॥ शेवटीं द्वाई विझाली ॥ ज्ञानदेवीं आज्ञा केली कीं जी मायबाप ॥ ७ ॥

## १७ जोहार.

जोहार मायबाप जोहार ॥ तुमच्या महाराचा मी महार ॥ भुक भुकयालों मी धालों ॥ तुमच्या उष्ट्यासाठीं आलों ॥ तुमच्या उष्ट्याची मज आस ॥ तुमच्या दासाचा मी दास ॥ चोख्या ह्मणे आणिली मी पाटी ॥ देवा तुझ्या उष्ट्यासाठीं ॥ १ ॥

## १८ जोहार.

जोहार मायबाप जोहार ॥ माझें नांव विठुनाक महार ॥ सांगतों ऐका एक विचार ॥ तो बळकट धरा जी मायबाप ॥ १॥ गांव पांचा पंचवीस प्रजेचा ॥ तेथें कारभार सहाजणांचा ॥ तो ऐकिजे माय बाप ॥ २ ॥ ज्या धन्याचे पदरीं शेर ॥ त्यासी नाहीं कधीं जोहार ॥ अवघा अहिजीचा कारभार ॥ काम करितों कीं जी मायबाप ॥ ३ ॥ आबाजीनीं हवालीं केला गांव ॥ धन्याचें विसरला नांव ॥ तलप आल्यावरी ठाव ॥ पळावया कैंचा कीं जी मायबाप ॥ ४ ॥ जेव्हां तलफ लागे बाकीची ॥ तेव्हां तुह्मा आह्मा सुदबुद कैंची ॥ ह्मणवूनियां सहाजणांची ॥ भीड धरूं नका कीं जी मायबाप ॥ ५ ॥ सहाजणें राहतील एकीकडे ॥ गांठ तुह्मा आह्मांशींच पडे ॥ मग

कोणी इकडे तिकडे ॥ झालों नदेती कीं जी मायबाप ॥ ६ ॥ करा भक्तीचा कुळवाडी ॥ धरा हरिनामाची गोडी ॥ नाहींतरी चौऱ्याशींची बिडी ॥ पायीं पडेल कीं जी मायबाप ॥ ७ ॥ तेथील मार्ग सपाट ॥ विष्णुलोकीं वाजवा घांट ॥ मग धुड धुडां वाट ॥ धांवाल कीं जी मायबाप ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं कुळवाडी मोठा ॥ तेणें बाकीस मारला फांटा ॥ उघड केला दारवंटा ॥ कैलासींचा कीं जी मायबाप ॥ ९ ॥

## १९ जोहार.

जोहार माय बाप जोहार ॥ मी तो एकनाथ महार ॥ लहानसा महाराचा पोर ॥ माझा बोलण्याचा विचार ॥ दूसरा नाहीं कीं जी मायबाप ॥ १ ॥ माझ्या बोला ऐकिजे ॥ मोठे मोठे उमराव राजे ॥ तुम्हीच का जीवाजी नजाणतां ॥ वेळेस संदेह धरितां कीं जी मायबाप ॥ २ ॥ चैतन्यचावडीचा पहार ॥ कीं मी मिराशी महार ॥ जेव्हां नवता गांवचा अवार ॥ मज खोळंख नाहीं कीं जी मायबाप ॥ ३ ॥ कायापुरचा अचाट पाया ॥ यमाजी बाजी जाले बेहया ॥ त्यापुढें पाहती पळाया ॥ मनाजी संगें मिळाले खाया ॥ परि नाहीं वाट कीं जी मायबाप ॥ ४ ॥ पेंढ्या केल्या शिष्यराच्या ॥ खोंडें गाई चारी सा घरच्या ॥ चोप बसतील यमाजीच्या ॥ मग कोण सोडवील कीं जी माय बाप

॥ ५ ॥ बाराजणें फुगवितील गाल ॥ शेवटीं तुह्मीच बांधिले जाल ॥ तुमचे होतील बेहाल ॥ तेव्हां तुह्मास कोण सोडवील कीं जी मायबाप ॥ ६ ॥ सारे कडेचे पोहणारे ॥ दहा आणि पांच पोरें ॥ एक नाथ करितो जोहार ॥ अक्कल धरा कीं जी मायबाप ॥ ७ ॥

## २० जोहार.

जोहार मायबाप जोहार ॥ मी अविद्या नगरींचा महार ॥ सवार माझें नोहे नगर ॥ आकारास आलें कीं जी मायबाप ॥ १ ॥ म्यां साहा चाकर ठेविले ॥ ते माझे बळें वर्तती वहिले ॥ मला गांजिती बळें ॥ अन्याय नसतां कीं जी मायबाप ॥ २ ॥ तुह्मी अवघे एकत्र झाला ॥ माझें घर मोडावयाचा मनसुबा केला ॥ जरी माझें अगत्य असेल धन्याला ॥ तरींच मजला ठेवील कीं जी मायबाप ॥ ३ ॥ तुह्मीं अवघे संतसज्जन ॥ रूपीं मिळालां परिपूर्ण ॥ ह्मणून माझें हेळण ॥ करितां कीं जी मायबाप ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे देवा ॥ अविद्येचा संग मज नसावा ॥ जन्म मरणाचा ठेवा ॥ चुकवा कीं जी मायबाप ॥ ५ ॥

## २१ जोहार.

जोहार मायबाप जोहार ॥ मी विठोबा पाटलाचा महार

सांगतों सारासर विचार ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ १ ॥ गांव तो पांचा पाटलांचा ॥ पंचविस प्रजांचा ॥ तेथें सहा जणांचा कारभार कीं जी मायबाप ॥ २ ॥ ज्या धन्याचें हें शहर ॥ त्या धन्यासी नाहीं जोहार ॥ अवघा ओढित कारभार ॥ ऐजीकडे कीं जी मायबाप ॥ ३ ॥ ऐजीची चाली फार ॥ सारा ओढिताती कारभार ॥ परी सहा जणांसी आधार ॥ ऐजीचा च कीं जी मायबाप ॥ ४ ॥ बाप तुह्मी धन्यासी राजी राखा ॥ नाहींतरी शेवटीं होईल वाखा ॥ मग कोणी नाहीं सखा ॥ सोडविता कीं जी मायबाप ॥५॥ कामाजी बाजी हुद्देदार ॥ क्रोधाजी हा सरदार ॥ यांचे वेगळाले विचार ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ ॥ ६ ॥ मदाजी बाजींचें वेगळें बंड ॥ त्यासि मिळाला लोभ भावंड ॥ अवघ्यांनीं मिळोनि थोतांड ॥ रचिलें कीं जी मायबाप ॥ ७ ॥ गांव तो होता चांगला ॥ परी या सहाजणांनींच नाश केला ॥ तुह्मींही त्यांसीच मिळाला ॥ हें बरें काय कीं जी मायबाप ॥ ८ ॥ परी ते राहतील एकीकडे ॥ शेवटीं गांठ तुह्मासीच पडे ॥ मग इकडे ना तिकडे ॥ होना कीं जी मायबाप ॥ ९ ॥ ऐजीनें यांस कारभार दिला ॥ यांनींच गांवाचा नाश केला ॥ शेवटीं खाईल तुह्मांला ॥ हें बरें कीं जी मायबाप ॥ १० ॥ गांवांतील तीन पांच थोर ॥ पंचवीस त्यांचा विस्तार ॥ घडी घडी त्यांचा समाचार ॥

घेत जावा कीं जी मायबाप ॥ ११ ॥ रयतेचें फार हित करावें॥ सारियासी आवरोनि धरावें ॥ धन्याचे कामासीं रुजू असावें ॥ लागतें कीं जी मायबाप ॥ १२ ॥ तुह्मांस धन्यानें दिला गांव॥ तुह्मीं विसरला त्यांचें नांव ॥ तलप आलिया लपावया ठाव ॥ मग कैंचा कीं जी मायबाप ॥ १३ ॥ तुह्मी धन्यासी करितां चोरी ॥ ऐजीकडे करी येरझारी ॥ परी या सहाजणांसी सारी दोरी ॥ तुमचीच कीं जी मायबाप ॥ १४ ॥ परी जेव्हां होईल ठावें ॥ तेव्हां कळों येईल स्वभावें ॥ घडि घडि आपुलें हित करावें ॥ लागतें कीं जी मायबाप ॥ १५ ॥ जेव्हां तलब होईल धन्याची ॥ तेव्हां तुह्मां मुदत कैंची ॥ ह्मणोनी महाजणांची ॥ भीड धरूं नका कीं जी मायबाप ॥ १६ ॥ आतां ऐजीची आस्था सोडा ॥ धन्याची बाकी हळू हळू झाडा ॥ नाहींतरी यायीं पडेल खोडा ॥ प्रपंचाचा कीं जी मायबाप ॥ ॥ १७ ॥ आतां असो अवघी उपाधी ॥ धन्याची भेट घ्यावी आधीं ॥ तें मी सांगतों सुबुद्धी ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ ॥ १८ ॥ परि मी ल्हानसा दिसतो महार ॥ मजवरी धन्याचा अखत्यार ॥ बहुत धण्याचा प्यार ॥ मज नफरावर कीं जी मायबाप ॥ १९ ॥ सद्भावशांतीसीं घ्यावें ॥ मजपाठीशीं तुह्मीं असावें ॥ जेथें धणी ये तें घर ठावें ॥ मज नफरास कीं जी मायबाप ॥ २० ॥ श्रवणासी धरावी वाट ॥ कीर्तनाचा

चालवावा घाट ॥ विष्णु स्मरणाचा संघाट॥आहे कीं जी मायबाप ॥ २१ ॥ पुढें आहे विश्रांतीचें स्थान ॥ सज्जनांचें पादसेवन ॥ दास्यत्व अर्चन वंदन ॥ ध्यानमार्ग कीं जी मायबाप ॥२२॥ तेथ जातां नलगे उशीर ॥ समीप जनार्दन दातार ॥ सखया भक्तांचें मंदिर ॥ आहे कीं जी माय० ॥ २३ ॥ पुढें आहे धन्याचें घर ॥ तेथें जाऊन करावा जोहार ॥ मी धन्याचा असें महार ॥ जवळींचा कीं जी मा० ॥ २४ ॥ जेव्हां भेटी होईल धण्याची ॥ तंव नित्य दिवाळी सुखाची ॥ मग सर्वसत्ता तुमची ॥ होईल कीं जी मा० ॥ २५ ॥ जेथें आहेत धणी ॥ तेथें जावें लोटांगणीं ॥ मग स्वताच होईल मिळणी ॥ आत्मसुखाची कीं जी मायबाप ॥ २६ ॥ या मार्गें गेले थोर थोर ॥ नारदादि शुकेश्वर ॥ धन्याचे दरबारीं निरंतर ॥ राहतात कीं जी मा० ॥२७॥ जे जे या मार्गीं गेले ॥ ते ते धन्यासीं रुजू झाले ॥ जीवन्मुक्ती पावले ॥ एका कीं जी मायबाप ॥ २८ ॥ जोहार माय बाप जोहार ॥ गव्हांची रोटी घृताची धार ॥ धन्यानीं पुरवावी अपार ॥ मज नफरास कीं जी मा० ॥ २९ ॥ महार बोलतो ह्मणोन नका जाऊं गवें ॥ नाहींतरी शरीर राहील हिरवें ॥ आपुलें स्वहित होईल बरवें ॥ तें करावें कीं जी माय० ॥ ३० ॥ बाकीसाठीं आपली मुळभुई सोडाल ॥ परमुलखा जरी जाल ॥ तरी बाकीचा निकाल ॥ नाहीं कीं जी माय० ॥ ३१ ॥ धरा

भाव भक्तीची कुळवाडी ॥ काढा शेतांतील पेढी ॥ नाहीं तरी पायीं पडेल बिडी ॥ अविद्येची कीं जी माय० ॥ ३२ ॥ हे कायापूर नगरी ॥ ब्रह्मयानें रचिली खरी ॥ म्यां विवेकें जाणूनि बरी ॥ मन मिळली कीं जी माय० ॥ ३३ ॥ एकाजनार्दनीं कुळवाडी मोठा ॥ त्याणें बाकीस मारिला फांटा ॥ अखंड कैकैलासीं दारवटा ॥ मोकळा केला कीं जी मा० ॥ ३४ ॥ अखंड कैलासीं राहणें ॥ गुरुजनार्दनाचें हेंच देणें ॥ सुखसमाधी असणें ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ ३५ ॥

## २२ जोहार.

जोहार मायबाप जोहार ॥ पाटिल पांडे जोहार ॥ देसाई देशमुख जोहार ॥ कांजी ये सरदार ॥ कोडून राखिलें कीं जी माय बाप ॥ १ ॥ उघडा उघडा नेत्रांचीं ब्रह्मकवडें ॥ एका धर्मरायाचें प्रमाणनिवाडें ॥ जेणें चुकेल जन्ममरणाचें सांकडें ॥ इमारती लांकडें रानोमाळ होतील कीं जी माय बाप ॥ २ ॥ खडीफरज धर्मराज खरा ॥ तेणें कुलिषा मारून केला चुरा ॥ माझे धन्याचे घरा ॥ कधीं मधीं येत जा कीं जी मा० ॥ ३ ॥ आकाबाई सावकारीण मोठी ॥ कायापुर नगरी केली खोटी ॥ तिनें तर पाडिली भल्यांसी तुटी ॥ तेथें तुमचें काय चाले कीं जी मा० ॥ ३ ॥ त्याही जांवयासी ह्मणे लें-

करा ॥ त्यासी वाढितात्ती तूपसाकरा ॥ मला देखून लपतां एक सरा ॥ अंतकाळीं चाकर मीच कीं जी मा० ॥ ५ ॥ जांवयासी वाढी तूप लई ॥ मला ह्मणतां उरलें नाहीं ॥ घरबुडालें याचपायीं ॥ प्रत्यक्षग्वाही मीच कीं जी मा० ॥ ६ ॥ सकाळ कोणी जाऊं नका ॥ मागील बाकी ठेवूं नका ॥ नाहाक एखादा धका ॥ बैसेल कीं जी माय० ॥ ७ ॥ अविद्येखिडकीवाटेगेला ॥ तों यमदूतें धरूनि नेला ॥ लक्षचौऱ्यांशीं मारथी मारथिला ॥ आइका कीं जी माय० ॥ ८ ॥ झाडाल बाकी तर तुह्मी व्हाल सुखी ॥ हें सत्य तिहींलोकीं ॥ झेंडा नौबद लावा कीं जी मायबाप ॥ ९ ॥ एका जनार्दनीं महार बोले ॥ नका जाऊं गर्वें ॥ मारितां अंग होईल हिरवें ॥ सांगतों बरवें कीं जी मायबाप ॥ १० ॥

## २३ जोहार.

जोहार मायबाप जोहार ॥ मी देहगांवींचा महार ॥ पार्वतीच्या गळ्याचा हार ॥ ईश्वराचा सर्व शृंगार ॥ कीजे मायबाप ॥१॥ मृत करोनी सांगतों साचें ॥ पैसे टाका माझ्या धन्याचे ॥ बाकी ठकवूंनका त्याचे ॥ कीजे मा० ॥ २ ॥ पैल हा मनाजी मोठा फितवेकर ॥ यानें लाविला थोर घोर ॥ आवर बुद्धाई आपला पोर ॥ नाहींतरी धनी कोपेल कीजे मायबाप ॥ ३ ॥

विकल्पजी शेटे सदाचि धान ॥ पाहतात आपुलाची मान ॥ जेव्हां तोंडावर बैसेल व्हान ॥ तेव्हां डोळे पुसाल कीं जी मायबाप ॥ ४ ॥ वासनाईनें फितूर केला ॥ घरचा भेद बाहेर नेला ॥ हा विचार धन्यास जर कळला ॥ धनी धरून नेईल कीजे मा० ॥ ५ ॥ तैसीच ही ममताई आवा ॥ इनें लाविला उभा दावा ॥ ती ओढील हाता पायांचा सावा ॥ मग थकाल कीं जी मायबाप ॥ ६ ॥ निंदाई आवाचें तोंड मोठें ॥ मागे मागें मोडी बोटें ॥ म्यां म्हटलें कोण बोलती नेटें ॥ हाद टाकून कीजे मा० ॥ ७ ॥ अशा आवाचा खोटा चाळा ॥ ज्यासी त्यासी घालिती डोळा ॥ मागती नवनीताचा गोळा ॥ परि अंतीं जड जाईल कीं जी मा० ॥ ८ ॥ हा देह पाटलाचा गांव ॥ पांच पंचविसांची वेग लागलीच हाव ॥ आणि पन्नासांचें नांव ॥ घेऊन कीजे मायबाप ॥ ९ ॥

## २४ जमाखर्च.

ऐका जमाखर्चाची खंडणी ॥ नरदेह जमेशीं धरूनी ॥ बाकी साल हल्लीं उगवणी ॥ शून्य घालीं संसारा ॥ १ ॥ संसार लक्षचवऱ्यांशी योनी ॥ बाकी व व्याज तेरीज मिळूनी ॥ सावधान गुरुचरणीं ॥ वसूल केला नरदेह ॥ २ ॥ नरदेह सालमजकूर ॥ रुजू साल गुदस्त पूर्व संसार ॥ सदर गुरुकृपा

निर्विकार ॥ सालें भरलीं उगवलाजी ॥ ३ ॥ संचित क्रिय-
माण विचार ॥ पुण्यपाप स्वर्ग नरकद्वार ॥ वेदशास्त्रपुराण
निर्धार ॥ स्वहित सार देखिलें जी ॥ ४ ॥ अहंभाव बाकी
ठेविली ॥ ती सद्‌बुद्धीनें नाहिंशी केली ॥ विवेक विचारानें
पाहिली ॥ वसूल केला नरदेह ॥ ५ ॥ मुखमुश्रीफ व्यवहार ॥
हा तव स्वस्तीचा शृंगार ॥ प्रेमहुजूर सुंदराक्षर ॥ सरस्वतीवर
झाला कीं जी ॥ ६ ॥ चातक जन्ममूर्ख ते केले ॥ सुखदुःख
इच्छा एकलेनि नेले ॥ तेगुह्यमुखीं मुश्रिफी आले ॥ शिल्लक
सुटली ब्रह्मादिकांची ॥ ७ ॥ स्वधर्म खर्च केला ॥ तो फळ
रुजू पाहिला ॥ ब्रह्मार्पण मजुरा केला ॥ फांटा ओढिला शू-
न्याचा ॥ ८ ॥ विचार सुर नित्य नेमाचें ॥ सावधान एकचि-
त्ताचें ॥ वर्म सुखें केलें सद्गुरुचें ॥ नांव अविद्येचें त्यजिलें जी
॥ ९ ॥ विवेक आप्तवर्ग स्वामींचा ॥ वडील बंधू सत्वजीचा ॥
झाडा पाहिला प्रवृत्तीचा ॥ अंतर्यामीं हरी हरी ॥ १० ॥ ज्ञानच-
क्षूनें अति सुरेख ॥ नित्यस्वरूप पाहिलें आलेख ॥ देखोनि नर-
देह देखणा झाला ॥ नरदेह जन्मासी आला ॥ ११ ॥ अज्ञान
बाकी झाडा झाला ॥ पुढें शिलकेसी चुकविला ॥ जमाखर्च
स्वानंदाचा झाला ॥ जमाखर्च संसारवाहो ॥ १२ ॥ नाहीं बंध-
न मोक्षसंदेहो ॥ गुरुकृपा स्वानुभवो ॥ देखोनि नरदेहीं संदेहो ॥
अनुभव जमाखर्च जनार्दनीं ॥ १३ ॥

## २५ पत्र.

माझें पत्र धन्याला ॥ वैकुंठवासी नांदतो त्याला ॥ असा धनी माझा भला ॥ माझ्या पूर्वजांचा उद्धार केला ॥ १ ॥ भक्तसंकटीं रक्षिला ॥ मजवर फार उपकार केला ॥ तडी तापडी धांवून आला ॥ पत्राचा मजकूर त्यानें पाहिला ॥ २ ॥ संकट पाहूनि मला बोध केला ॥ चार खाणी नऊ दरवाजे ॥ दशइंद्रियें हाच बोध केला ॥ ३ ॥ भक्ति मुक्ती शक्ती मजपाशीं ठेविल्या ॥ ऐसे चारी वेदवाणी ॥ तुका गर्जतो पुराणीं ॥ ४ ॥

## २६ हुशारी.

हुशियार बंदे हुशियार ॥ तेरातन खबरदार ॥ तुझे खिलावन एक नार ॥ बतांदेव सतरावी गरपाइ है ॥ १ ॥ बडे बडे साधु संत ॥ उनसें करले एकांत ॥ बतादेव सिद्धांत ॥ आदिअंत उनोंका ॥ २ ॥ बडी तो सबसी बडी ॥ जाडी तो धरतरीसे जाडी ॥ एकवीस खन्नकी माडी ॥ गगनबीचमें खडी है ॥ ३ ॥ दसवें द्वार झुरोका ॥ देखले दिदार उनोंका ॥ नैन. दीन लगावे ॥ ४ ॥ ब्रह्माविष्णु बडे देव ॥ अजब गुरु ग्यानी महादेव ॥ पाहिये उनोंकी ठेव ॥ बैठके जग झुलाई है ॥ ५ ॥ अलख पुरुषको धुनी ॥ तुर्या चेतरही उन्मनी ॥ नहीं आदि अंत पुरानीं ॥ पन्नीं महाकारण रूप हय ॥ ६ ॥ अहंनाद निः-

शब्दमों सोसलगायी ये चष्ममों ॥ चुनकहै मसूरमों ॥ झक झक झकाकतहै ॥ ७ ॥ लखलखाट हिरेकी खान ॥ चकचकाट कोटि भान ॥ निशिदिन करतना ध्यान ॥ ग्यान बहोत आ· येगे ॥ ८ ॥ दिलरीझे तो करले धंदा ॥ भट गोपाळ उनोंका बंदा ॥ चूपसो ने सो बताई हय ॥ ९ ॥

## २७ धामधूम.

धामधूम बार उडविला ॥ ऐसा कोण गलीम आला ॥ कायांतून किल्ला वेढिला ॥ कामक्रोध तो पाळविला ॥ १ ॥ स्वकर्म राजा राज्य करी ॥ आवाज पडिला कानावरी ॥ द्वारपाळ होते द्वारीं ॥ काय गलबला आहे द्वारींगा ॥ २ ॥ किल्ला वेढिला गलिमानें ॥ अवघी रयत गेली पळून ॥ घाबरा राजा जाण ॥ अंतकाळीं दिलें टाकून ॥ बावाहे तुमचे कोणगा ॥ ॥ ३ ॥ प्रधान अवघी रयत मिळून ॥ सामिल वैऱ्यास अवघे जाण ॥ राजा पाहे विलोकून ॥ नाहीं रस्ता जावया पळून गा ॥ ४ ॥ हातचें गेलें पदरचें गेलें ॥ आत्मराजाशीं संकट आलें ॥ काय निर्वाण कर्म ठेलें ॥ वैऱ्यानें बांधोन नेलें गा ॥ ॥ ५ ॥ प्राणायाम पडल्यावरी ॥ नासेल माझें काय उरी ॥ नेहलें यमानें बांधून ॥ हातबेड्या घालूनगा ॥ ६ ॥ तप्तभुई चालवून ॥ सहस्र विंचू अंगा लावून ॥ लोहार्गळा तापवून ॥

माझ्या मुखीं टोंचती गा ॥ ७ ॥ नरक कुंडामाजी घालून ॥ मजला करविती ताडण ॥ आतां सरलें जन्ममरण ॥ एकाजनार्दनीं नाहीं स्वाधीन गा ॥ ८ ॥

## २८ छडीदार पहिला.

सुन सुन बेहया बेहया ॥ छडीदारमे पाया ॥ ध्रु० ॥ राम नामकी छडी ॥ ये तो तीनलोकमें बडी ॥ सुन० ॥ १ ॥ रामनामका घोडा ॥ येतो तीनलोकमें बडा ॥ सुन० ॥ २ ॥ त्रिगुणशीकरपर जाना ॥ व्हां राम नाम जपना ॥ सु० ॥ ३ ॥ कहे कबीर सुन प्यारा ॥ चुका ले जन्ममरणका फेरा ॥ सुन सुन बेहया बेहया ॥ छडीदारमें पाया ॥ ४ ॥

## २९ छडीदार दुसरा.

हम छडीदार छडीदार ॥ खडे गुरुके दरबार ॥ करूं नामका ललकार ॥ कालहो जावे बेजार ॥ अलख निरंजन गुरु हमारे ॥ त्रिगुणरहित निराकार ॥ हम० ॥ ऐसी करूं नामकी ललकारी ॥ चौदा भुवनमें जिनकी फेरी ॥ अघटित अनिवार गुरुका नाम ॥ जिनकूं भूलना धाम ॥ अनंत भुवनमें विश्राम ॥ जिनके प्रतापसे जिनके रुकारसे सच्चित आनंद पैदा हुवा ॥ जहांसे ओंकारका ठाव मछाया ॥ उसमें तीन गुणकी ज्योत ॥ मातृकेका उजाला ॥ जगबनाया ॥ पंचतत्वका भास ॥ उसका

हो जावे नास ॥ आनंदनाथ कहे हम छडीदार ॥ खडे गुरुके दरबार ॥ उतरा जगत्का भार ॥ हुवा स्वार कलीमों ॥ हम छडीदार छडीदार ॥ खडे गुरुके दरबार ॥

## ३० भालदार.

सुन सुन हो भय्या हो भय्या ॥ भालदारमें पाया ॥ ध्रु० ॥ लिया रामनामका भाला ॥ कामक्रोध मारडाला ॥ सुन० ॥ १ ॥ रामनामका घोडा ॥ ये तो तीन लोकमें बडा ॥ सुन० ॥ २ ॥ त्रिगुणशीकरपर जाना ॥ व्हां रामनाम जपना ॥ सुन० ॥ ३ ॥ कहतकबीर सुनप्यारा ॥ चुकाले जन्ममरणका फेरा ॥ सुन सुन-हो भय्या हो भय्या ॥ ४ ॥

## ३१ चोपदार पहिला.

चोपदार आला चोपदार आला ॥ ध्रु० ॥ माझे चोपदाराचें रहाणें ॥ आकाश स्वर्ग पाहणें ॥ चतुर्मुखब्रह्मा चकित होऊन ॥ निराकारींची वस्ती दिधली विष्णूनें ॥ १ ॥ शंख चक्र गदा घेऊन ॥ महादेवी शून्य द्वारपाळ जाण ॥ हा हा हा कळिकाळ टाकिन छेदून ॥ रंडी चंडी शक्ति टाकिन भेदून ॥ चोपदार आहें मी जाण ॥ २ ॥ आह्मास नाहीं उपाय ॥ आह्मास नाहीं बाप ना माय ॥ खरी चाकरी कोठें करावी ॥ एका जनार्दनीं दृढ धरावी ॥ ३ ॥

## ३२ चोपदार दुसरा.

हुकुम साहेबका मैं तो चोपदार उनकाजी ॥ ध्रु० ॥ राम लछमन भरत सत्रुघन ॥ सीता माई देखाजी ॥ जांबुवंत हनुमान मिलाकर लुटा दिई लंकाजी ॥ हु० ॥ १ ॥ ब्रह्माविष्णु महेश प्रमुका अवतार खासाजी ॥ इंद्र चंद्र पावक भास्कर वाचस्पती-काजी ॥ हु० ॥ २ ॥ दत्त याज्ञवल्की अगस्ति विश्वामित्र देखा-जी ॥ देव सनकादिक नारद खडा है तुकाजी ॥ ३ ॥

## ३३ चोपदार तिसरा.

बंदा साहेबका मैं तो चोपदार उनकाजी ॥ ध्रु० ॥ रत्न जडित सिंहासन ऊपर बैठे जगद्गुरूजी ॥ बैठे जगद्गुरू तुमारी वाणी ललकारूजी ॥ बंदा सा० ॥ १ ॥ रामनामकी लकडी लेके दरवाजे ठारा ॥ काम क्रोध पीछे दवडाजी ॥ बंदा सा० ॥ २ ॥ कहत कबीरा सुनभई साधू मैं होऊं हुजूरकाजी ॥ मैं होऊं हुजूरका नौकर सरकार साहेबकाजी ॥ बंदा साहेबका मैं तो चोपदार उनकाजी ॥ ३ ॥

## ३४ दिंडीगाण.

आह्मी निर्गुणपुरचे रहिवाशी दिंडी गावण ॥ चाललों तीर्था लागून ॥ ज्ञान दिंडी खांद्या घेऊन ॥ ध्रु० ॥ मंदिल अं-

गरखा बिजार सांगन ॥ हें भक्तीचें भूषण एक समला दिला सोडून जी जी जी ॥ हे अलंकार दागिने सर्व चढवून ॥ गळ्यांत माळा घालून ॥ आह्मीं गेलों आनंदानें जी जी जी ॥ ॥ १ ॥ आह्मीं प्रथम गेलों दिंडीरवनालागून ॥ तेथें स्नान करून केलें रुक्मिणीचें दर्शन जी जी जी जी ॥ चाल ॥ गंगा गोदावरी यमुना सरस्वती ॥ नर्मदा कावेरी गोमती त्या तीर्थांतून मिळती जी जी ॥ तोड ॥ बाराच्या अमलामध्यें भक्त येऊन ॥ गंधपुष्पें वाहून पूजिती आनंदानें ॥ २ ॥ काय असेल खुबी आज बोला सभेपरती ॥ उत्तरास प्रतिउत्तर द्यावें ॥ ३ ॥

## ३५ जंगम.

तो एक जंगम हो जंगम हो मूळ तीर्थाचा संगमहो ॥ ध्रु० ॥ त्रिकूटावरि मठ केला ॥ त्याचा द्वैतभाव निमाला ॥ तो एक० ॥ १ ॥ निर्विकार भूतमात्रा ॥ त्याला अक्षई माळा गात्रा ॥ तो० ॥ २ ॥ हेंचि अंतरखुण दावी ॥ शांती भस्म कपाळीं लावी॥ तो० ॥ ३ ॥ अक्षय भिक्षा मागे ॥ अखंड सद्गुरु भजनीं लागे ॥ तो एक० ॥ ४ ॥ शिवदिन त्याला आधीं ॥ अया ह्मणुनी शरण साधी ॥ तो० ॥ ५ ॥

## ३६ मानभाव पहिला.

मानभाव बाई ॥ आह्मा भिक्षा वाढा कांहीं ॥ ध्रु० ॥ काम

आणि क्रोध आतां दंभुनियां पाई ॥ लोभ आणि अहंकार आह्मी अनवरिला बाई ॥ १ ॥ आशा मानशा तृष्णा केली सर्व पायमोडी ॥ कल्पना आणि भ्रांतीच्या पाईं घातलिसे बेडी ॥ २ ॥ महादेवाच्या खुणा आह्मी सांगुनियां देऊं ॥ सोन्या रुप्याचे देव आह्मीं ठेंचुनियां खाऊं ॥ ३ ॥ भक्ति आणि भावार्थांचा गडबडगुंडा केला ॥ एका जनार्दनीं बाई मानभाव झाला ॥ ४ ॥

## ३७ मानभाव दुसरा.

आतां मानभाव झालों भिक्षावाढा बाई भिक्षा वाढा बाई ॥ ॥ ध्रु० ॥ मुळींचाच मानभाव वस्त्रें केलीं काळीं ॥ कोरके मागुन झोळी भरली उलटी काठी धरली ॥ १ ॥ सोन्यारुप्याचे देव आह्मीं मोडुनियां खाऊं ॥ शेंद्राचे देव आह्मीं दृष्टीनिया पाहूं ॥ ॥ २ ॥ एका जनार्दनीं मानभाव झाला ॥ झोळीवरती झोळी ठेवुन गडबडगुंडा केला ॥ ३ ॥

## ३८ वासुदेव पहिला.

गोविंदा रामाहो, गोपाळा रामाजीजी ॥ ध्रु० ॥ सद्गुरु देवाजीचे बा ॥ आह्मीं पाय वंदिले जीजी ॥ भवभय संशय हे, क्लेशवृक्ष छेदिले जीजी ॥ अक्ष लक्षबाणे संधान साधिलें जीजी ॥ गोविंदा० ॥ १ ॥ ह्या संतसज्जनांचीबा, कैसी सभा

बैसली जीजी ॥ दर्शनें आशाबेडी, तात्काळ तुटली जीजी ॥ गो० ॥ २ ॥ जीवका शिवहे बा, ऐसी भ्रांती फिटली जीजी। भाविक साधकांची, गुरु माये भेटली जीजी ॥ गोविंदा० ॥ ॥ ३ ॥ चिद्घन दैवत देवा, तुझें नाम चांगलें जीजी ॥ गाइन टाळ घोळें, मन माझें रंगलें जी जी ॥ सांवळें रूपडें हो, ऐसें ध्यान लागलें जीजी ॥ उद्धवें सुख तेव्हां, अनंतदेहें भोगिलें जी जी ॥ गोविंदा० ॥ ४ ॥

## २९ वासुदेव २ रा.

गुरुनाथा निरंजनहो ॥ अपरु देखिलें जीजी ॥ ध्रु० ॥ पाहतां रूप तें बा ॥ माया लोभ आटलाजीजी ॥ संसारबद्ध आशा ॥ भवपाश तुटला जीजी ॥ कल्पना द्वैतकामा ॥ तात्काळ आटली जीजी ॥ गु० ॥ १ ॥ अहंता हा त्रिविध ताप ॥ सर्व जाळिले जीजी ॥ नेलेंसे ब्रह्म भुवना ॥ अक्षय ये दाटले जीजी ॥ हा ब्रह्मरस प्याला ॥ घोटुनी पाजिला जीजी ॥ विश्रांति झाली तेणें ॥ जीवपणें मुकलों जीजी ॥ गुरु० ॥ २ ॥ त्रिकूटावरि जातां ॥ श्रीहाट देखिलें जीजी ॥ गोल्हाट औटपीठ ॥ पाहोनि त्यागिलें जीजी ॥ ब्रह्मरंध्रसहस्रदळीं ॥ एक मूर्त बैसली जीजी ॥ त्याहून परात्पर सहज ॥ न्याहाळिलें जीजी ॥ गु० ॥ ३ ॥ रंगनाथ निजदाता ॥ त्यानें दान दीधलें जीजी ॥ निरभय केलें

तेणें ॥ द्वैतासी मुकलों जी जी ॥ गोपाळनाथ नामें ॥ स्वरूपीं आटलें जीजी ॥ गुरु० ॥ ४ ॥

## ४० वासुदेव ३ रा.

गोविंदा रामाहो गोपाळा रामा जीजी ॥ ध्रु० ॥ श्रीकृष्ण सौंगड्याचे, आह्मी बाळ बागडे जीजी ॥ आनंदें गाऊं नाचूं परि पाहूं त्याकडे जीजी ॥ इंद्रियें गाई आमुच्या, जाताती दाहींकडे जीजी ॥ अनुहात वेणुनादें, वळी आपणाकडे होहो ॥ १ ॥ गोविंदमूर्तिभोंवते, गोपाळ शोभती जीजी ॥ ओहं सोहं हुंबरीनें करीं टाळी वाहती जीजी ॥ सत्कीर्ति चामरें हो, हरिवरी ढाळिती जीजी ॥ श्रीकृष्णमूर्ति वरुनी, देहे लोन उतरिती होहो ॥ २ ॥ आनंदमाधवानें, ऐसा खेळ दाविला जीजी ॥ अहंकारकल्पनेसीं, संदुष्ट मारिला जीजी ॥ बा निःसंग शस्त्रें घातें, भववृक्ष छेदिले जीजी ॥ गणपती नामनौके, ठेवुनी तारिलें होहो ॥ गोविंदारामाहो ॥ गोपाळा रामा जीजी ॥ ३ ॥

## ४१ वासुदेव ४ था.

रामकृष्ण गितीगात टाळचिपळिया वाजती छंदें आपुल्या नाचत ॥ निज घेउनियां फिरतगा ॥ १ ॥ जनींवनीं अवघा देव ॥ ऐसा मनीं वसोंद्या भाव गा ॥ २ ॥ निजदानाची थोर आ-

वडी ॥ वासुदेवासी लागली गोडी ॥ मुखीं नाम उच्चारी घडो घडी ॥ ऐसी कराहे वासुदेव जोडी गा ॥ ३ ॥ अवघा सारोनि शेवट झाला ॥ प्रयत्न नचले कांहीं केला ॥ जागा होई सांडोनि झोंपेला ॥ दान देई वासुदेवाला गा ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन्य त्याचें जिणें ॥ जिहीं घातलें वासुदेवा दान ॥ त्या नलगे येणें जाणें ॥ जाहलें वासुदेवीं राहणें गा ॥ ५ ॥

## ४२ आंधळा पहिला.

धर्म जागो सद्गुरुचा ॥ जो कां परोपकारी ॥ आंधळ्या दृष्टी देतो ॥ त्याचें नाम उच्चारीं ॥ ध्रु० ॥ पूर्वजन्मीं पाप केलें ॥ तें बा अधिक विस्तारलें ॥ नाशिवंत विषय सूख ॥ सेवितां तिमिर कोंदलें ॥ चौऱ्यायशीं लक्षयोनी ॥ फिरतां दुःख भोगिलें ॥ ज्ञानदृष्टी हारपली ॥ दोन्ही नेत्र आंधळे ॥ धर्म० ॥ १ ॥ संसार दुःखमूळ ॥ चहूंकडे विंगळ ॥ विश्रांती नाहीं कोठें ॥ रात्रंदिवस तळमळ ॥ कामक्रोध लोभ शून्य ॥ पाठी लागले ओंगळ ॥ कवणा आतां शरण जाऊं ॥ दृष्टि देईल निर्मळ ॥ २ ॥

## ४३ आंधळा दुसरा.

सहज मी आंधळागा ॥ निजनिराकारपंथें ॥ वृत्ति हे निवृत्ति झाली ॥ जन न दिसे तेथें ॥ मी माझें हरपलें ॥ ठायीं जे थच्या तेथें ॥ अदृश्य तेंचि झालें ॥ कांहीं दृश्य जें होतें ॥ १ ॥

सुखें मी निजलोंगा ॥ श्रुतसारोनि तेथें ॥ त्रिकूट शिखरींगा ॥ दानमिळे आइतें ॥ ध्रु० ॥ २ ॥ टाकिली पात्र झोळी ॥ धर्म अधर्म आशा ॥ कोल्हाळ चुकवीला ॥ त्रिगुणांचा वोळसा ॥ न मागें भीक आतां ॥ हाची झाला भरंवसा ॥ वोळली सत्रावींगा ॥ तिणें पुरविली इच्छा ॥ ३ ॥ ऊर्ध्वमुखें आळवीला ॥ सोहं शब्दाचा नाद ॥ अरूप जागवीला ॥ दाता देउनी छंद ॥ घेऊनि आला दान ॥ निजतत्वीं निजबोध ॥ स्वरूपीं मेळविले ॥ नांव ठेविलें भेद ॥४॥ शब्द हा बहु सार ॥ उपकाराची रासी ॥ ह्मणोनि चालविला ॥ मागें येतील त्यासीं ॥ मागोनि आली वाटा ॥ सिद्ध ओळीचि तैसी ॥ तरले तरलेगा ॥ आणिक हे विश्वासी ॥ ॥ ५ ॥ वर्म तें एक आहे ॥ धरावा दृढभाव ॥ जागीव नागवण॥ लागों नेदी तो ठाव ॥ ह्मणोनि संग टाकी ॥ सेवीं अहेत भाव ॥ तुका ह्मणे हाची संतीं ॥ मागे केला उपाव ॥ ६ ॥

## ४४ आंधळा तिसरा.

देवा तुज चुकलोंगा ॥ तेणें दृष्टीं आलें पडळ ॥ विषयग्रंथीं गुंतलोंसे ॥ तेणें होतसे विव्हळ ॥ अंध मंद दृष्टी झाली ॥ गिळूं पाहे हा काळ ॥ अवचित दैवयोगें ॥ निवृत्ति भेटला कृपाळ ॥ १ ॥ धर्मजागे निवृत्तीचा ॥ तेणें पडिलें पडळ ॥

ज्ञानाचा निजबोध ॥ विज्ञान रूप सकळ ॥ ध्रु० ॥ तिहींलोकीं विश्वरूप ॥ दिव्य दृष्टी दिधली ॥ द्वैत हें हरपलें ॥ अद्वैतपणें माउली ॥ उपदेशुनी ब्रह्म ज्ञानांजन साउली ॥ चिद्रूप दीप पाहे ॥ तेथें तनु मनु निवाली ॥ २ ॥ दान हेंची आह्मां गोड॥ देहदृष्टी निमाली ॥ विज्ञानही प्रगटलें ॥ विदेह वृत्ति स्फुरली ॥ देह हे हरपले ॥ ज्ञेय ज्ञाता निमाली ॥ दृश्यते तदाकार ॥ ममता तेथें बुडाली ॥ ३ ॥ प्रपंच हा नाहीं जाण ॥ एकाकार वृत्ती झाली ॥ मी माझें हरपलें ॥ विषय अंधया बोली ॥ उपरती सद्गुरू बोध ॥ तेथें प्रकृती संचरली ॥ धर्म मार्ग शुद्धपंथें ॥ हातीं काठी दीधली ॥ ४ ॥ वेदमार्गें मुनी गेले ॥ त्याचि मार्गें चालिलों ॥ नकळेचि विषय अंधा ॥ ह्मणोनि उघड बोलिलों ॥ चालतां धर्म धुरा ॥ तरंगाकारीं हरपलों ॥ ज्ञानदेव निवृत्तीचें ॥ द्वैत अवघें निरसलें ॥ ५ ॥

## ४५ आंधळा चवथा.

पूर्व जन्मीं पाप केलें ॥ ते हें बहु विस्तारीलें ॥ विशयसुख नाशिवंत ॥ सेवितां तिमिर कोंदलें ॥ चौऱ्यांशी लक्षयोनी ॥ फिरतांदुःख भोगिलें ॥ ज्ञानदृष्टी हरपली ॥ दोन्ही नेत्र आंधळें॥१॥ धर्म जागो सदैवाचा ॥ जे बा पर उपकारी ॥ आंधळ्या दृष्टी देतो ॥ त्याचें नाम मी उच्चारीं ॥ ध्रु० ॥ संसारदुःख मूळ ॥

चहूंकडे इंगळ ॥ विश्रांती नाहीं कोठें ॥ रात्रंदिवस तळमळ ॥ कामक्रोध लोभश्वान ॥ पाठी लागले ओढाळ ॥ कवणा आतां शरण जाऊं ॥ दृष्टी देईल निर्मळ ॥ २ ॥ माता पिता बंधु बहिणी ॥ कोणी न धांवती निर्वाणीं ॥ इष्ट मित्र सज्जन सखे॥ हेतो सुखाची मांडणी ॥ एकला मी दुःख भोगी ॥ कुंभिपाक जाचणी ॥ तेथें कोणी सोडवीना ॥ एका सद्गुरु वांचोनी ॥ ३ ॥ साधु संत मायबाप ॥ तिहीं दिलें कृपादान ॥ पंढरीयात्रे नेलें ॥ घडलें चंद्रभागेचें स्नान ॥ पुंडलीक वैद्य राज ॥ पूर्वी साधिलें साधन ॥ वैकुंठींचें निजमूळ ॥ डोळां घातलें अंजन ॥ ४ ॥ कृष्णांजन एक वेळां ॥ डोळां ल्यालों आढळ ॥ तिमिर दुःख गेलें ॥ तुटलें भ्रांतीचें पडळ ॥ श्रीगुरु निवृत्ति राजे ॥ मार्ग दाविला सोज्वळ ॥ बाप रुक्मादेवीवर ॥ विठ्ठल दीनाचा कृपाळ ॥ ५ ॥

## ४६ पांगुळ पहिला.

मृत्यु लोकीं एक नगर ॥ त्याचें नांव पंढरपूर ॥ तेथील मोकासी तो हा उभा विटेवर ॥ पुंडलीक भक्तराज ॥ शोभे चंद्र भागेतीर ॥ बोलती साधुसंत ॥ जीवा वाटे हुरहूर ॥१॥ तुह्मी संत मायबाप ॥ येवढे उपकार करा ॥ न्यामज तेथवरी ॥ दाखवा दीनाचा सोइरा ॥ ध्रु० ॥ मज नाहीं हातपाय ॥ डोळां पडली झांपड ॥ कर्ण बहिर झाले ॥ वाचा बोल बोबड ॥ नाक मुख

गळूं लागलें ॥ लाळ आलें शेंबुड ॥ श्वाना परी गती झाली ॥ अवघे करिती हडहड ॥ तुह्मी संत० ॥ २॥ साधुसंत माय बाप ॥ जे कां दयेचे सागर ॥ भावाचें मुख्य स्थान ॥ भक्तीचें माहेर ॥ त्यानें मज दिलें कृपादान ॥ मस्तकीं ठेविला कर ॥ मायामोह निरसली ॥ शुद्ध झालें कलेवर ॥ तुह्मी संत० ॥ ३ ॥ भाव दिला मजसंगें ॥ मार्ग दाविला नीट ॥ भ्रांति निरसली दिसूं लागली वाट ॥ नाचत प्रेमाछंदें चालूं लागलों सपाट ॥ एकाजनार्दनीं पावलों पंढरी पेंठ ॥ तुह्मी संत० ॥ ४ ॥

## ४७ पांगुळ दुसरा.

पांगुळ झालों देवा ॥ नाहीं हात ना पाय ॥ बैसलों जयावरी सैराट तें जाय ॥ खेटतां कूप. काटी ॥ खुंट दरडी नाना पाहे ॥ आधार नाहीं कोणी ॥ मज बाप माय ॥ १ ॥ दाते हो दान करा ॥ जातों पंढरपुरा ॥ न्यावें मज तेथवरी ॥ दाखवा दीनाचा सोयरा ॥ ध्रु० ॥ हिंडतां गव्हाणेंगा ॥ शिणलों येरझारीं ॥ जन्मदुःखनिवारीं ॥ कीर्ति हे संतांमुखीं ॥ तो मज दावा हरी ॥ पांगुळ्या पाय देतो नांदे पंढरपुरीं ॥ २ ॥ या पोटाकारणेंगा ॥ झालों पांगिला जना ॥ नसरेचि मायबाप ॥ भिके नाहीं खंडना ॥ पुढारा ह्मणतीं एक ॥ तया नाहीं करुणा ॥ श्वान हें लागे पाठीं ॥ आशा तृष्णा दारुणा ॥ ३ ॥ काय मी

चुकलों गा ॥ मागें नेणवेची कांहीं ॥ नकळेची पापपुण्य ॥ तेथें आठवची नाहीं ॥ मी माझें भुललों गा ॥ दीप पतंगा सोई ॥ द्या मज जीवदान ॥ संत महाअनुभव कांहीं ॥ ४ ॥ दुरोनी आलों मी गा ॥ दुःख झालें दारुण ॥ यावया येथवरी ॥ होतें हेंचि कारण ॥ दुर्लभभेटी तुह्मापाईं झालें दर्शन ॥ विनवितो तुका संतां ॥ दोनी कर जोडून ॥ ५ ॥

## ४८ बहिरा पहिला.

बहिरा झालों या जगीं देवा बहिरा मी झालों ॥ ध्रु० ॥ नाहीं ऐकिलें हरिकीर्तन ॥ नाहीं केलें पुराण श्रवण ॥ नाहीं वेदशास्त्र शब्दगुण ॥ गर्भी बहिरा झालों यागुणें ॥ १ ॥ नाहीं सत्कीर्ति श्रवणा आली ॥ नाहीं संतवचनें ऐकिलीं ॥ पितृवचना पाठ दिली ॥ तीर्थ व्रतें असोनि त्यागिली ॥ २ ॥ माया माउली पाचारितां ॥ नाहीं शब्द दिला मागुता ॥ बहिर झालों नरदेहीं येतां ॥ एकाजनार्दनीं स्मरेन आतां ॥ ३ ॥

## ४९ बहिरा दुसरा.

बहिरा मी झालों देवा ॥ तुझे गुण ना ऐकिले ॥ भवाचे प्रवाहीं ॥ मी पडलों ऐसें झालें ॥ ध्रु० ॥ तें स्थान नाहीं होतें तयानें बुडविलें ॥ धांव पांडुरंगा ॥ दावीं संतांचीं पाऊलें ॥ बहिरा० ॥ १ ॥ संतांसीं विनवितों ॥ तुह्मी जाता पंढरीसीं ॥

सांगा माझी विनवणी ॥ एवढी पांडुरंगासी ॥ बहिरा० ॥ २ ॥ बहिरा मज ऐसें करीं ॥ नाइकें कोणाची हो निंदा ॥ दुसरें मज कांहीं नको ॥ लावीं रामनामीं सदा ॥ बहिरा० ॥ ३ ॥ याचक मी हेंचि मागें ॥ देईं संतांची सेवा ॥ हेची माझी प्रार्थना ॥ सांगा पंढरीच्या देवा ॥ खाकनाथ ह्मणतसे ॥ विठ्ठल नाथापरी ध्यावा ॥ बहिरा० ॥ ४ ॥

## ५० मुका पहिला.

मुका झालों वाचा गेली ॥ ध्रु० ॥ होतों पंडित महाज्ञानी ॥ दशग्रंथ षट्शास्त्रपुराणीं ॥ चारीवेद मुखोद्गत वाणी ॥ गर्वांमध्यें झाली सर्व हानी ॥ १ ॥ जिव्हा लांचावली भोजना ॥ दुग्ध घृत शर्करा पक्वान्ना ॥ निंदिलें उपान्ना ॥ तेणें पावलों मुखबंधना ॥ २ ॥ साधुसंतांची निंदा केली ॥ हरिभक्तांची स्तुती नाहीं केली ॥ तेणें वाचा पंगु झाली ॥ एकाजनार्दनीं कृपा लाधली ॥ ३ ॥

## ५१ मुका दुसरा.

मुका मी झालों देवा ॥ केला प्रपंच हेवा ॥ बहु दोष आचरलों ॥ पूर्वजन्मींचा ठेवा ॥ ध्रु० ॥ मुकलें पूर्वस्थान ॥ स्वरूपाचें विंदान ॥ माझा मी आहें कवण ॥ हें नकळेच ज्ञान ॥ संतांचे संगतीन ॥ नाहीं आत्मनिवेदन ॥ गुरुकृपा मज व्हावी ॥ येवढें

मागतों मी दान ॥ मुका मी० ॥ १ ॥ आतां मज वाचा देई ॥ गुण वर्णिन मी कांहीं ॥ संत कृपा करतील ॥ तेचि दाखविती सोई ॥ याचक मी हेंचि मागें ॥ उदारा तूं दाता होई ॥ नाहीं तरी सोडवीं रुद्रा ॥ जाईन आपुल्या ठायीं ॥ मुका मी० ॥ २ ॥ माई होउनि दुरमाई ॥ नको होउंचि आतां ॥ अर्थ माझे पुरवावे ॥ तुजविण कोण त्राता ॥ खाकनाथ हात ठेवी ॥ श्रीमस्तकावरुता ॥ विठ्ठलनाथा धन्य केलें ॥ वैष्णवा सरता ॥ ३ ॥

## ५२ गोंधळ पहिला.

त्रिभुवना माझारी ॥ एक विठाबाई सुंदरी वो ॥ १ ॥ उदोबोला उदो विठाबाई माऊलिचा वो ॥ ध्रु० ॥ गोंधळिया माझारी एक पुंडलीक नेटका वो ॥ घातला गोंधळ विठाबाईदाविली तिहीं लोकां वो ॥ २ ॥ गोंधळ घालित गेली कैसी रावणाच्या घरा वो ॥ शरणागता रक्षिलें वधिलें दशशिरा वो ॥ ॥ ३ ॥ वधुनि सहस्रार्जुन सर्वे आणिली कामधेनू वो ॥ कीर्ति चराचरीं तुजला ध्याती ब्रह्मा विष्णू वो ॥ ४ ॥ करूनि गोपाळकाला गोंधळ घाली वेणुनादीं वो ॥ गोपिकां सहित सवें गोपाळांची मांदी वो ॥ ५ ॥ आषाढी कार्तिकी तुझा गोंधळ वाळवंटीं वो ॥ सनकादिक येती गरुड टकीयांची दाटी वो

॥ ६ ॥ नाम याचा विठा कैसा गोंधळी नेटका वो ॥ वडिलांचें दैवत कुळस्वामिणी अंबिका वो ॥ ७ ॥

## ५३ गोंधळ दुसरा.

आह्मीं गोंधळी गोंधळी ॥ गोविंदगोपाळाचे मेळीं ॥ ध्रु० ॥ आमचा घालावा गोंधळ ॥ वासुदेव हरिनाम संभळ ॥ दहापांच घाला जेऊं ॥ तुमच्या गोंधळाला येऊं ॥ २॥ कामक्रोधबकरा मारा ॥ पूजा रखुमाईच्यावरा ॥ ३ ॥ जेथें विठूचें देऊळ ॥ तेथें तुकयाचा गोंधळ ॥ ४ ॥

## ५४ गोंधळ तिसरा.

पंढरपुरवासिनी तुझ्या रंगाणं नाचत असें हो ॥ नवस पुरवीं माझ्या मनिंची जाणुनियां इच्छा वो ॥ १ ॥ सुदिन सुवेळां तुझा मांडिला गोंधळ हो ॥ पंचप्राण दिवटे दोनी नेत्रांचे हिलाल हो ॥ २ ॥ मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवना माझारीहो ॥ चौक साधिला नाभीं कळस ठेऊनियां वरीहो ॥ ३ ॥ बैसली देवता पुढें वैष्णवांचा मेळाहो ॥ उदोकारें गर्जती कंठीं तुळशीच्या माळाहो ॥ ४ ॥ स्वानंदाचे ताटीं धूपदीप पंचारतीहो ॥ ओंवाळिली माता विठाबाई पंचमूर्तीहो ॥५॥ तुझें तुज पावलें माझा नवस पुरविं आतांहो ॥ तुका ह्मणे राखीं आपुल्या शरणागता हो ॥६॥

## ५५ गोंधळ चवथा.

रंगीं नाचे क्षेत्रपाळ ॥ आग्या चैतन्य वेताळ ॥ ब्रह्मानंदाचा गोंधळ ॥ सुख–सुकाळ माजविला ॥ १ ॥ शिधा जागरें जगजोगी ॥ ध्रु० ॥ अनुहाताची डंबरी ॥ बोधत्रिशूळ घेऊनि करीं ॥ नाचे चैतन्यशिखरीं ॥ सुखसहाकारीं बहिरव ॥ २ ॥ चित्तचैतन्य योगिनी ॥ मोहमहिषासुरमर्दिनी ॥ एकाजनार्दनाचे चरणीं ॥ भावभवानी नाचती ॥ ३ ॥

## ५६ गोंधळ पांचवा.

सुंदरमुख साजिरें कुंडलें मनोहर गोमटीं हो ॥ नागरनागखोपा केशर कस्तुरी मळवटींहो ॥ विशाळत्र्यंकटनेत्रीं वैजयंती तळपे कंठींहो ॥ कांसे पीतांबराची चंदन सुगंध साजे उटींहो ॥ १ ॥ अतिवरनंदा बाळा आली सुलक्षणा गोंधळावो ॥ राजस तेजोराशी मिरवे शिरोमणी वेल्हाळावो ॥ कोटी रवी शशि प्रभा लोपल्या सकळांवो ॥ नकळे ब्रह्मादिकां अनुपम्य इची लीळावो॥२॥ सांवळी सुकुमार गोजिरी भुजा शोभती चारिवो ॥ सखोल वक्षस्थळ सुढाळ पदक झळके वरीवो ॥ कंठीं क्षुद्रघंटिका शब्द करिती मधुरीवो ॥ गर्जति चरणीं वांकी अभिनव संगित नृत्य करीवो ॥३॥ अष्टांगीं मंडित काय वर्णावी रूप ठेवणींहो ॥ शोधिव शुद्धरसाची ओतींव लावण्याची खाणींहो ॥ सर्वकळा संपन्न मं-

जुळ बोल हास्यवदनीवो ॥ बहुरूपी नटली आदिशक्ति नाराय- णीवो ॥ ४ ॥ घटस्थापना केली पंढरपुर महानगरींवो ॥ अस्मा- नी मंडप दिला तिहीं ताळावरीवो ॥ आरंभिला गोंधळ इनें चंद्र- भागे तीरींवो ॥ आली भक्तकाजा कृष्णाबाई योगेश्वरीवो ॥ ५ ॥ तेहतीस कोटी देवांचा गुंडा अष्ट कोटी भैरव वो ॥ आरत्या कुर- वंड्या करिती पुष्पांचा वर्षाव वो ॥ नारद तुंबर गायन ब्रह्मानंदें करिती गंधर्ववो ॥ वंदी चरण रज तेथें तुकयाचा बांधववो ॥६॥

## ५७ बाळसंतोष पहिला.

बाळ संतोष ॥ बाबा बाळसंतोष ॥ ध्रु० ॥ तुझे अंगींचा उतारा ॥ तो मज देईंगा दातारा ॥ फिरोनि नये बा संसारा ॥ बाळसंतोष ॥ १ ॥ तुझे मस्तकींचा टोप ॥ देतां होईल प्र- ताप ॥ तेणें हरती त्रिविध ताप ॥ बा० ॥ २ ॥ शालू पीतांबर सखलाद ॥ ज्ञानकंचुकीही शुद्ध ॥ तुका ह्मणे मी प्रसिद्ध ॥ दान मागतों ॥ बा० ॥ ३ ॥

## ५८ बालसंतोष दुसरा.

बाळसंतोष बाबा बाळसंतोष ॥ ध्रु० ॥ आह्मी परात्पर देशी बाळसंतोष ॥ कोणी नोळखती आह्माली ॥ बा० ॥ टाकून आलों संतांपाशीं ॥ बा० ॥ १ ॥ जीर्ण स्वरूपाचा शेला ॥

बा० ॥ विषय भोगितां वीटला ॥ बा० ॥ तो मज द्यावा दाते वहिला ॥ बा० ॥ २ ॥ ऐक्यपत्वाचें बिरडें जोडी ॥ बा० ॥ त्रिगुणाची कसणी फेडी ॥ बा० ॥ जुनी कांचोळी रोकडी ॥ बा० ॥ ॥ ३ ॥ पूर्णत्वाची पूरणपोळी ॥ बा० ॥ स्नेहावरीलतेलवरी ॥ ॥ बा० ॥ प्रबोधलाडू तयावरी ॥ बा० ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मागतां दान ॥ बा० ॥ जिताचि जाणें जीवपण ॥ बा० ॥ शेखी दिलें शिवपण ॥ बा० ॥ ५ ॥

## ५९ बाळसंतोष तिसरा.

बाळसंतोष बाबा बाळसंतोष ॥ ध्रु० ॥ मी तो परात्पर भीकारी ॥ बाबा बाळ० ॥ ह्मणोनी आलों संतद्वारीं ॥ बा० ॥ द्या मज भक्तीची भाकरी ॥ बा० ॥ १ ॥ किती युगांचा मी जोगी ॥ बा० ॥ विभूत चर्चुनियां अंगीं ॥ बा० ॥ गळां वाजवी नाद शिंगी ॥ बा० ॥ २ ॥ त्राहि त्राहि त्राहि त्राहि ॥ बा० ॥ हे तो नमागे नमागे कांहीं ॥ बा० ॥ नामा ह्मणे सुखदाई ॥ बाबा बाळसंतोष ॥ ३ ॥

## ६० गारुडी पहिला.

शंखासुरानें तप करून ॥ केलें ब्रह्मयाचें आराधन ॥ नेगें वेद मूर्तिमंत जाण ॥ शंखासुरास नव्हतें मरण ॥ आकाशीं जळीं

काष्ठीं जाण ॥ असा वर दिधला होता महान परमेष्ठीनें ॥ १ ॥ अरेरे वेद नेले चोरून ॥ शंखासुराचा वध करून ॥ चारी वेद आला घेऊन ॥ गरगर चक्राकार भवंडी ॥ २ ॥ अघोर दैत्य मातले जाण ॥ धरा रसातळास नेऊन ॥ कूर्मरूप घेतलें विष्णूनें ॥ मेरु मांदार टाकिले घुसळून ॥ वासुकीची बराडी करून ॥ चवदारत्नें काढिलीं कोणकोण ॥ अललल त्यांचीं नांवें भिन्नभिन्न ॥ ३ ॥ वराहरूप घेउनी हरी ॥ क्षिती घेतली दाढेवरी ॥ महाबलाढ्य वराह हरी ॥ दैत्यदानवांचा संहार करी ॥ ४ ॥ गुर गुर धरा तारिली कीं यानें ॥ हिरण्यकश्यप मातला जाण ॥ देश बांधुन त्रिविधतापानें ॥ त्यासी नाहीं जन्ममरण ॥ घरीं दारीं मृत्यु नाहीं ह्मणुन ॥ जळीं काष्ठीं पाषाणीं जाण ॥ प्रल्हाद पोटीं आला जाण ॥ भूभार हरावया कारण ॥ स्तंभीं प्रगटला नारायण ॥ अरे ! रे ! रे ! रे उदर टाकिलें चिरोन ॥ ५ ॥ पांचवा अवतार जाण ब्रह्मचारी ॥ उभा राहिला बळीच्या द्वारीं ॥ दान मागे श्रीहरी ॥ बळी पाताळीं घातला द्वापारीं ॥ बाण मारून वामनेत्र छेदिला ॥ तर तर र र रा माझा गारुडी वीर पुरा ॥ ६ ॥ साहवा अवतार झाला परशुराम ॥ एकविस वेळा निक्षेत्री धरा जाण ॥ केली माझ्या स्वामीनें ॥ शीर मातेचें उडवून ॥ साच केलें पितृवचन ॥ काम धेनुसी आला घेऊन ॥ पहा पहा कीर्तिनें भरलें त्रिभुवन

॥ ७ ॥ सातवा अवततार अजनंदन ॥ त्याचा पुत्र रघुपति जाण ॥ केलें अहिल्येचें उद्धरण ॥ उदकावरी पाषाण ताहून ॥ कुंभकरण इंद्रजित जाण ॥ अततततता घेतला प्राण॥ ॥ ८ ॥ आठवा वसुदेवाचा नंदन ॥ त्याला कंसाचें बंधन ॥ सांत गर्भ वधिले त्याणें ॥ मोह माया आठवी जाण ॥ यशोदेचे उदरीं घालून ॥ बंदीं उपजलें आपण जाण ॥ द्वादशकळा छेदून ॥ केलें नंदाचें मोचन ॥ गोकुळीं घालवा नेऊन ॥ तेथील माया आणिली उचलून ॥ अष्ट वर्षे निवांत जाण ॥ तुह्मी आतां सुखी रहाणें ॥ कंसचाणूर मारीन ॥ शिशुपाळाचा घेईन प्राण ॥ मग ठेवीन धनुष्यबाण ॥ देवकी तुझ्या गळ्याची आण ॥ आजपासून पांच वर्षानें ॥ एकदां भेटी देईन जाण ॥ तोंवरी स्थीर करा मन ॥ आतां करतों तुमचें ध्यान ॥ ९ ॥ नववा उभा विटेवरी ॥ काय वर्णावी त्याची थोरी ॥ मौनरूप धरून हरी ॥ दोन्ही कर कटावरी ॥ दृष्टी नासाग्रीं ठेविली सारी ॥ भक्तजनांस कृपा करी ॥ १० ॥ दहावा कलंकी होणार ॥ अश्वगमन करील सार ॥ चंद्र सूर्य बुडेल आकार ॥ मग कैंचा चराचर ॥ जनार्दन ह्मणे कोण पाहणार ॥ ११ ॥

## ६१ गारुडी दुसरा.

अभक्तीचा जिव्हाळा ॥ पहा किती आंगीं भरला ॥ अ-

भक्तांशीं बोलतो ॥ विंचु जैसा झोंबतो ॥ पहा आत, त, त, ता ॥ बडी बडी बात करतो ॥ दांत विचकुन पाठी लागतो ॥ आल्यागेल्याशीं उत्तर करितो ॥ पालथा घालून तुला तुडवितो ॥ १ ॥ अब, ब, ब, बा कर्म तुझें ओढवलें ॥ विषय सुखांत लंपट झालें ॥ अशांत तोंड पाहिलें ॥ घर घरकी आला रगडा॥ तोंडावर मारतो घुसडा ॥ गती मागतां दांत खाय करकरां ॥ अंगीं नाहीं भक्तीचा वारा ॥ २ ॥ अच, च, च, चा घरबेघर पाहा हुन्नर ॥ कशी उड्या मारती ॥ हो, हो, हो, हो चिप्‌बैठबे चिप्‌बैठ ॥ वादिकूं वाद, छातिपर बैठ ॥ दुस्मानकूं रगडा ॥ फेक मार तो चल, चल, चल, चल ॥ त्याचें तोंड झालें काळें ॥ गती गारुडी अवधान बोले ॥ ३ ॥ शेंडी धरून वांकवितों करकरा ॥ हा पंचभूतांचा मारा ॥ सोडितो अवधान ॥ दांत विचकून चढतो फार ॥ यारे यारे विषय खेळ हा फार दोडकिरे ॥ त्यानें विश्वामित्राची मोडली खोड किरे ॥ तुमची आमची कोण गती ॥ विश्वामित्र रंभेच्या मागें ॥ कुत्रा होऊन लागलासे ॥ हुलु लु, लु, लु, अशा मोठ मोठ्यांच्या गती ॥ किमित्रा तुझा पाड किती ॥ तुका ह्मणे जन भुलले ॥ नर्कवासीं प्रवेशले ॥ गारुड्याचा खेळ केला ॥ तुका विमानारूढ झाला ॥ ४ ॥

## ६२ फकीर पहिला.

भला संतनका संग, खावे निजबोधनकी भंग ॥ सदानंदनमों दंग, ऐसे मलंग फकीर है ॥ १ ॥ लियो संतनकी दुमाला ॥ मेरा तुटे भवजंजाला ॥ कहे जनार्दन कंगाला ॥ फकीरहो रहै है ॥ २ ॥

## ६३ सफेत कलंदर.

सफेत कलंदर फकीर ॥ बावा सफेत कलंदर फकीर ॥ ध्रु० ॥ काम क्रोध मद मत्सर काटो ॥ उन्मनी ज्या घर बैठो ॥ मारो आसन बैठो त्रिकूटपर ॥ करतारकी जीकरी ॥ १ ॥ अंदर भगवा कियोरी बावा ॥ जोग जुगूत भरपाई ॥ अल्लाके नामपर लगन लगाई ॥ चुकी कमलपर लिखीर ॥ २ ॥ ऐसी फकीरकी थोरी ॥ बावा जात कुल सब तारी ॥ कहत कबीरा सुनभई साधु ॥ सीता राम गुरु रूपीर ॥ ३ ॥

## ६४ मलंग फकीर.

संतनके संग ॥ खावे निजबोधनकी भंग ॥ सदा आनंदमों दंग ॥ ऐसी मलंग फकीर ॥ १ ॥ ग्यानके मैदान खडे ॥ शमदमसे आनलढे ॥ वहोतांके तखत चढे ॥ ऐसा मलंग फकीर ॥ २ ॥ किया संतनका घुमाल ॥ तेरा पिता बहु जंजाल ॥ ऐसा एकनाथ कंगाल ॥ ऐसा मलंग फकीर ॥ ३ ॥

## ६५ मलंग.

नजर करे साइजीके बावा दुरथी तमासा देख ॥ लकरी फांसा लेके बैठे ॥ आगल ठेकण भेक ॥ काय भुला येक देख ॥ आखों मारत डांगो बाजार ॥ दमरी चमरी जो नर भुला ॥ सोत आधो ही लत खावे ॥ नाहीं बुलावत कीसे बुवा ॥ आपही मत जाय ॥ कहे तुका उस आशके संग ॥ फीर गोते खाय ॥१॥

## ६६ जोगी पहिला.

जगजोगी जागजग बोलती ॥ ध्रु० ॥ जागता जागदेव ॥ राखा नाहीं भाव ॥ १ ॥ जगजोगी० ॥ अवघा क्षेत्रपाळ ॥ पुजाहे सकळ ॥ २ ॥ जगजोगी० ॥ पूजापत्री कांहीं ॥ फळ पुष्प तोही ॥ ३ ॥ जगजो० ॥ बहुत दिवसां फेरा ॥ आला या नगरा ॥ ४ ॥ जग० ॥ नको घेऊं भार ॥ धर्म हाची सार ॥५॥ जगजो० ॥ तुका मागे दान ॥ द्यावें जी अनन्य ॥ ६ ॥ जग०

## ६७ जोगी दुसरा.

माझा वेडा तामसा जोगी ॥ देखिलागे माय ॥ विभूत चर्चुनी अंगीं ॥ स्मशानांत रहाय ॥ आरक्त लोचन ज्यावें ॥ पिंगट मिशा भूमिस दाढी लोळे ॥ बाबरे ओंठ डोईस लावूनि राख ॥

मोकळ्या जटा भिकेचे तुकडे, मागूनि भोंपळ्यांत खाय ॥
माझा वेडा सामसा जोगी ॥ देखिलागे माय ॥ १ ॥ स्मशां-
नांत ज्याचें राहणें ॥ राखेंत लोळे ॥ वाजवी तो एक पुंगी ॥
भोंवताली भूतें ॥ आतां खाइलसा दिसतो ॥ भय वाटतें माय ॥
माझा वेडा० ॥ २ ॥ वृषभवाहन गजचर्म मेखळा वरी ॥ एक
मृगाचें चर्म हातरी भूमीवरी ॥ दुसरें वाघाचें चर्म घेई अंगा-
वरी ॥ सदा चार अठरा माशा घवघवती अंगावरी ॥ धुळ-
धुळ वाणी बसला, टकमकागे माय ॥ माझा वेडा० ॥ ३ ॥
तीनशें साठ ठिगळांची गोधडीवरी ॥ शंभरवांव दोरी ॥ शि-
वली ती कूसरी ॥ वरी चक्राचे बुट्टे दिसे गोजरी ॥ वेड्यानें
आणली चोरी ॥ असें वाटतें गे माय ॥ माझा वेडा० ॥ ४ ॥
खडबड मणी एककाळा ॥ त्याच्या ओंवूनि माळा ॥ जन्म
जोड हातांत विभूतीचा गोळा ॥ अखंड ओढित भांग धुंद
होऊनि न्हाय ॥ वेडा० ॥ ५ ॥ न्याहाळुनी पाहतो वेडा दि-
सतो असे खुनी ॥ एकवीस मुंडक्यांची माळ दोरींत ओंवुनी ॥
गळ्यांत घालुन बसला ओढी एक मणी ॥ लल्लाटीं अर्धा चंद्र
लोक पाहतीगे माय ॥ वेडा० ॥ ६ ॥ लोखंडाचें एक शस्त्र
त्याला तीन धारा ॥ दुसरें कुऱ्हाडी वहानें वागवी ॥ भुंभुम-
वाजवी डमरू हंसू येतें गे माय ॥ वेडा० ॥ ७ ॥ बुड्वणतरी
एक वृषभ त्यावरी बसे जुनाट योगी ॥ योग निरंजनीं बसे ॥

त्याचे मागे लागला सिद्ध नागेश्वर ॥ नारायण दास ह्मणे दावा माझे वेड्याचे पाय ॥ वेडा० ॥ ८ ॥

## ६८ दरवेश पहिला.

अल्ला तुही तुही रे मौला तुही तुहीरे ॥ ध्रु० ॥ बागम्यानें तबला वाजे घरमें नहीं कोई ॥ खालीं हांडीमें चुवे कुडकुडे नाचन लागे डोई ॥ १ ॥ नारद तेरी गांडभरीबे अवरत मागेदान ॥ साठ सहस्र पौंड बजावे बच्चे दानोदान ॥ २ ॥ ब्रह्मा तेरी गांड भरीबे पढगये चारी बेद ॥ सरस्वतीका खेळ भया जब ब्रह्मा बेटी चोद ॥ ३ ॥ कहत कबीरा सुन भई साधू ॥ ये पद हे निर्बानी ॥ ये पदका कोई करेगा निंदा ॥ उसकूं नरक निशानी ॥ ४ ॥

## ६९ दरवेश दुसरा.

अल्ला तोही तोहीरे ॥ नबी तोही तोहीरे ॥ ध्रु० ॥ हमही मुंडा तुमही मुंडा मुंडा तेरा बाप ॥ तेरे बापनें गद्धो चोदे ॥ हमकूं लागे पाप ॥ १ ॥ बगलम्यानें तबल बाजे घरमें नहीं कोई ॥ खाली हंडी चुवा बजावे नाचन लागे डोई ॥ २ ॥ सब देवनमें ब्रह्मा बडा पढता चारी वेद ॥ सरस्वतीसे हाल हुआ जब ब्रह्मा बेटी चोद ॥ ३ ॥ ढवळगिरी पर्वत म्यानें शंभू कर्ता तप ॥ भिल्लीणीके गांठ पडी तब तपहुवा गप ॥४॥ पार।

शरकी नुनी उठी जब घिवरण लगी मीठी ॥ जमुनाका संग भयो व्यास व्यास करउठी ॥ ५ ॥ नारद बडा जगद भार्री औरत मागें दान ॥ साठसंवत्सर लडके किये होगये दानादान ॥ ६ ॥ गोकुळ म्याने राज करतहै नाम रखा गिरिधारी ॥ सोव्या सहस्र लंवड्या चोदे होगये ब्रह्मचारी ॥ ७ ॥ मेरे साहेब उचमाडी कपडा धुवा न जाय ॥ हातका साबण गिरगया तो फिरफिर गोते खाय ॥ ८ ॥ कपडा फाटे चमडा तूटे होगये सब सापास ॥ एका जनार्दनका बंदा दिलका दरवेश ॥ ९ ॥

## ७० दरवेश तिसरा.

अल्ला करेसो होवे बाबा ॥ करतारका सिरताज ॥ गऊ बछरे तिस चलावे ॥ १ ॥ यारी बधोन साज ख्याल मेरा साहेबका बाबा ॥ आपहुवा करतार ॥ २ ॥ व्हाके आगे चढे पीछे आप हुवा असवार ॥ जिकर करो अल्लाकी बाबा सबल्या अंदरबसो॥ कहे तुका जे नर बुझे सो भया दरवेश ॥ ३ ॥

## ७१ नानकशा पहिला.

अल्ला रखेगा वैसाबी रहिना ॥ मौला रखेना वैसा रहिना ॥ ध्रुव० ॥ कोइ दिन सिरपर छत्तर उडावे ॥ कोइदिन सिरपर घडा चढावे ॥ कोइदिन तुरंग उपर चढावे ॥ कोइदिन पाव चलावे ॥ अल्ला० ॥ १ ॥ कोइ दिन सक्कर दूध मलीदा ॥ कोइ

दिन अल्ला मागत गदा ॥ कोइ दिन सेवक हाथ जोड खडे ॥ कोइ दिन नर्जीक न आवे धेडे ॥ अल्ला० ॥ २ ॥ कोइ दिन राजा पट अधिकारी ॥ एक दिन राजा कंगाल भिकारी ॥ कहत कबीरा करत करतारी ॥ गाफल केव करता मगरूरी ॥३॥

## ७२ नानकशा दुसरा.

जो कोई वसुधा दान दे आवे ॥ पूर्वजज्ञ करे करावे ॥ तीरथ वरथके स्नान ॥ नहिं नहिं हरिनाम समान ॥ १ ॥ जो कोई जावे हिलमीलगले ॥ कासी करवत लेकर मरे ॥ दशद्वारके कोंढे प्राग ॥ नाहिं नहिं हरिनाम समान ॥ २ ॥ काया कष्टवे कलेवर जीवे ॥ नाकुच खावे नाकुच पीवे ॥ गगन मंडलमां जोरें ध्यान॥ नहिं नहिं हरिनाम समान ॥ ३ ॥ आगली पिछली बात बनावे ॥ नेम धरमसे तन छुपावे ॥ चारों बेद पढो पुरान ॥ नहिं नहिं हरिनाम समान ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जद कृपा भई ॥ प्रेम भगवत हरदे धरलाई ॥ कहे निसदिन भजन भगवान ॥ नहिं नहिं हरिनाम समान ॥ ५ ॥

## ७३ नानकशा तिसरा.

समज उमजकर पग रख नाहिं तो आगे मुष्किल है ॥ गुजरान करो गरीबसे बाबा मगरूरीसे धोका है ॥ १ ॥ नरतन गये तो पस्तावेगा फेर सुदरना लबाड है ॥ कुइ एक पडे

पापकर्ममों बहुत जन्मका फेरा है ॥ २ ॥ ही तनु आछी सबसें दिखावे आरामसे ॥ शालदुशाले जोरू बच्चे भुलना नहीं गज-बसें ॥ ३ ॥ भूल जावे तो नजीक नामिले लंगोट कंबलकी ॥ यमदूतका शिरपर सोटा बरी बात नहीं होनेकी ॥ ४ ॥ चार खूट है नगरी हमारी खानेकूं कुच तोटा नहीं ॥ कहना हुषार तुमकूं कर कर घर घर फेरी करता नहीं ॥ ५ ॥ कहत कबीरा सुन भये साधु हुषार होना अच्छा है ॥ नासुने तो सोटा मारो हमकूं गरज क्या तेरी है ॥ ६ ॥

## ७४ तुंबडीवाला.

तुंबडीवाले गुरु समर्थ कोइ नहिं हमारे सात ॥ भजन करे दिनरात बाबा ॥ तुंबडीभर दे० ॥ १ ॥ सुरत जायगी सरदी होयगी ॥ हो जायगी गर्दी बाबा ॥ तुंबडीभर० ॥ २ ॥ क्या कहते है खासा जैसा थिल्लरका मासा ॥ काल डालेगा फांसा ॥ तुंब० ॥ ३ ॥ अभिमानकी गांठ फेर पडे गा ॥ फट-लेवो हरिनाम मिठा ॥ तुंब० ॥ ४ ॥ क्या कहता है गडबड होजायगी ॥ सडबड आब छोडदे गडबड ॥ तुंब० ॥ ५ ॥ क्या कहता है ग्यान बाचे पोथी पुरान ॥ साधु ब्रह्माको ध्यान ॥ तुंबडी० ॥ ६ ॥ फेर आनेका नहीं तेरे हात कुच नहीं बाबा ॥ तुंब० ॥ ७ ॥ कहे धायाजीका पूत नाम रामजी मख्यात॥

है आगरीकी जात ॥ उसकू प्रसन्न गुरुनाथ ॥ तुंब० ॥ ८ ॥

## ७५ बोबडा.

कानु संबाल्ले संबाल आपुल्या गाई ॥ आह्मी आपुलाल्या घल्‍ांसि जातों भाई ॥ कानुसं० ॥ ध्रु० ॥ काल्ले गौली गाय याली ॥ तिचा खल्चले लय लय गोल झाला ॥ सगल्या गौल्याला गौल्याला लपलप दिला ॥ मी गल्लीबल्ले गलीबले ॥ मी गलीब ह्मनुन थोला दिला ॥ आतां कामल्ले कामले ॥ आतां कामले कलतो माझा लौला ॥ कानु सं० ॥ ॥ १ ॥ तुह्मी थोल्ले थोल पातलाचे लेकु ॥ तुह्मांमध्यें मी गलीब आहें येकु ॥ माझी कैचील्ले तुह्मांस आवल नाहीं ॥ काय थांगुल्ले थांगुले ॥ काय थांगुले काते मोलले पायीं कानु० ॥ २ ॥ तुझे काशेसले काशेसल्ले ॥ तुझे काशेसल्ले पीतांबल पिंवला ॥ हात जोलितो जोलितो ॥ हात जोल्तिो मध्वनाथ भोला ॥ कानु संभाल्० ॥ ३ ॥

## ७६ शिद्दी.

ख्याल किया या मछलीवाले वले ॥ धुंडी दर्याव गोविंद महंमद बले ॥ १ ॥ शंकासुर दैत्य मारिया वल्ले ॥ ल्यायो चारी बेद महंमद ॥ २ ॥ खेल खेलावे आवे गोविंद महंमद ॥ गोविंद महंमद ॥ ध्रु० ॥ सातो दर्याव एक वजुदा ॥ भेद

निकाले लाये ॥ गोविंद महंमद ॥ ३ ॥ जप तप जमीन दल मले वले ॥ तब दिया पीठ महंमद ॥ ४ ॥ मारे दैत्यासुर आगे वले ॥ जंगल जंगल फीरे महंमद ॥ ५ ॥ जब तब जमीन दलमले वले ॥ तब दिया उसे दात महंमद ॥ ६ ॥ कच्छपरुपी भगवान वले ॥ चीप चीप पकरी मिठी महंमद ॥ ७ ॥ सब देव म्याने नरसिंह बडाया वले ॥ भेदा मृगजस्तंभ महंमद ॥ ८ ॥ हिरण्यकच्छप दैत्य मारा या वले ॥ रखा भक्त प्रऱ्हाद महंमद ॥ ९ ॥ बळराम सत्वा आगळ वले ॥ उसे दिया पाताल राज्य महंमद ॥ १० ॥ खुजी सुरत ठेंगणी वले ॥ फीरे फकीरी हाल महंमद ॥ ११ ॥ परशराम माको मारीया वले ॥ फत्ते किया बापका बोल महंमद ॥ १२ ॥ दशरथका रामराणा वले ॥ राज्य दिया बिभीशन खान वले महंमद ॥ १३ ॥ नंदजीके किसन सांवले वले ॥ खेळे जमुना तीर महंमह ॥ १४ ॥ बौध्य सुरत लिया है रबानी वले ॥ पाणी फत्तर हुवे महंमद ॥ १५ ॥ मेरा ना घोडा चढीयो वले ॥ उसें कहें कलंकी गोविंद महंमद ॥ १६ ॥ एका जनार्दनी यंवकर बोले ॥ तेरे दिदारकी भक्त ममे महंमद ॥ १७ ॥ गोविंद महंमद ॥ गोविंद महंमद.

## बहुरूपी.

एक भोरपी निर्गुण ॥ खेळे दारुण ॥ ध्रु० ॥ अहंकार

ढोल वाजवून ॥ दाही दिशा बांधिल्या त्यान ॥ त्रिगुण पेंठ उभारून ॥ अर्ध अर्ध दोर लावून ॥ खेळ मांडून ॥ १ ॥ आत्मा बहुरूपी चांगला ॥ चार शून्यें उडोन गेला ॥ निरालंबीं नो बैसला ॥ दहावेद्वारीं खेळ मांडिला ॥ जन पाहून ॥ २ ॥ मनावी भोरपीण हाटी ॥ कांस घालोनी उफराटी ॥ हातापायांची करूनि मिठी ॥ खेळत जाण ॥ ३ ॥ खेळे भोरपी निर्गुणाचा ॥ अंतपार नाहीं त्याचा ॥ दास ह्मणे अनुभव याचा ॥ गुरुपासून ॥ एक भोरपी निर्गुण ॥ खे० ॥ ४ ॥

## ७८ डौर ( पंचनाद. )

पांच नाद—चटपट चटपट चटपट चटपट ॥ खटपट खटपट खटपट खटपट ॥ फटफट फटपट फटफट फटफट ॥ लटपट लटपट लटपट लटपट ॥ तळमळ तळमळ तळमळ तळमळ.

**पहिला नाद**—चटपट चटपट चटपट चटपट ॥ शिखा सूत्र सपाट ॥ वीर जाहोमीला दृष्टपरी अफूट ॥ तैसाची वायां केली ताडा तोडी ॥ वृथा त्यजिली सूत शेंडी ॥ विषयवासना ॥ नसंधी उपाधी गाढी श्रीपदा ॥ संन्यास घेतला काचा ॥ जिव्हा शिस्न वेंचिलें लाचा ॥ विटंब केला कायाचा ॥ या लागीं चटपट ह्मणतात ॥ १ ॥

**दुसरा नाद्**—खटपट खटपट खटपट खटपट ॥ शास्त्र परदना अलोट ॥ बांधोनि विपत्तिमोट ॥ सेना सुनाट धाववी ॥ वाद तर्का लावालावी ॥ भरला विषयांचे नानवी ॥ वरि वरि वृंदावन दिसे बरवें ॥ परी अंतरीं कडवट गा दादांनों ॥ यालागीं खटपट ह्मणतात ॥ २ ॥

**तिसरा नाद्**—फटफट फटफट फटफट फटफट ॥ या-नादाची वाट नीट ॥ ओलंघुनी औटपीठ ॥ उर्ध्व पाट भेदती ॥ मग पवन समरसेनी ॥ ब्रह्मरंध्रीं लीन होउनी ॥ हा अभि-मान वाटोनी ॥ झाले पणें फुंजती ॥ ते ओखटे गा डौराकारा ॥ करूनि देहाचा मातेरा ॥ भरूं पाहतां सुषुम्नाद्वारा ॥ परी अ-साध्य खरा तो मार्गु ॥ या लागीं फटफट ह्मणतात ॥ ३ ॥

**चवथा नाद्**—लटपट लटपट लटपट लटपट ॥ मिळ-वुनीं शिष्यांचा थाट ॥ अद्वैत ज्ञानाचा बोभाट ॥ भरला हाड जीवीं कैसा ॥ गुरुलोभें धनमान ॥ शिष्य लोभें अती लीन ॥ दोघांशीं लटपट लागली पूर्ण ॥ कोणी कोणासी आवरेना ॥ या लागीं लटपट ह्मणतात ॥ ४ ॥

**पांचवा नाद्**—तळमळ तळमळ तळमळ तळमळ ॥ ध-रणें पारणें निर्मळ ॥ तीर्थयात्रांलागीं चपळ ॥ घेतला पळ जीविकेशीं ॥ नानावृत्ति आरंभिली ॥ नानादैवतें पूजिलीं ॥

शेखीं काळें नरडी चेपिली ॥ दुःखें तळमळे गा। दादांनो या ॥ लागीं तळमळ ह्मणतात ॥ ५ ॥

ऐसे पांच भेद नादाचे ॥ मनीं धरा विवेकाचे ॥ ज्ञानदेव ह्मणे निवृत्तीचे ॥ बोला वाचे हरिनाम दादांनो ॥ ६ ॥

## ७९ हलवाई.

आह्मी हलवाई हलवाई ॥ करूं हरिनाम मिठाई ॥ आह्मी हलवा० ॥ ध्रु० ॥ त्रिभुवन भट्टीही स्थापून ॥ पेटविला ब्रह्माग्न ॥ त्रिविधकर्म काष्ठें जाण ॥ यास दग्ध करून ॥ काया कढई ठेवून ॥ ज्ञानघृत घालून ॥ शर्करा अनुभूती ही पाहीं ॥ करूं हरिनाम मिठाई ॥ आह्मी ह० ॥ १ ॥ शांती दुग्ध हें आटून ॥ खवा केला जाण ॥ अनुभव शर्करा मेळवून ॥ पेढे बर्फी सगुण ॥ जिलबी रुक्मिणीरमण ॥ कोमल मधुर गहन ॥ राधा वल्लभ लड्डु पाहीं ॥ करूं हरि० ॥ आह्मी ह० ॥ २ ॥ गोविंद गोपाळ निर्मळ ॥ बत्तासा केवळ ॥ साकर फुटाणा वर्तूळ ॥ भावें केलें बळ ॥ दो अक्षरीं अवघा खेळ ॥ अनंत सोज्वळ॥ केले पदार्थ ठायीं ठायीं ॥ करूं हरिनाम मिठाई ॥ आह्मी हल० ॥ ३ ॥ वाल्मिक शुक व्यास सुंदर ॥ पुरे दुकानदार ॥ हा एक त्रिकुटींचा बाजार ॥ संत येतिल फार ॥ दाही दिशेचे घेणार ॥ घेती अति सत्वर ॥ ग्राहिक बहुविध येती पाहीं ॥

करूं हरिनाम मिठाई ॥ आह्मी ह० ॥ ४ ॥ आपुल्या आपुल्या शेरानें ॥ मनीं चमन भरून ॥ केशवदास बोले वचन ॥ गुरु-कृपेची खूण ॥ ज्याला लाधेल विठ्ठल केण ॥ तेणें शोध करून ॥ आपली आपली ओळखुन घ्यावी ॥ करूं हरिनाम मिठाई ॥ आह्मी हलवाई ह० ॥ ५ ॥

## ८० भांड.

माया छांड सुनोजी ॥ अच्छा भांड बनोजी ॥ ध्रु० ॥ ब्रह्म-देवने बेद पढाया माया लगी मोठी ॥ सरस्वतीके गलेपडा उसकी गांड फाटी ॥ माया० ॥ १ ॥ विष्णुके गांड पीछे मायाका धंदा ॥ खेळ करते फसलपडी मिठी लगी वृंदा ॥ माया० ॥ २ ॥ महादेव बडादेव सब देवनका बाबा ॥ भिल्लिनीके पीछे लगा करता तोबा तोबा ॥ माया० ॥ ३ ॥ अहिल्याके देखनकूं इंद्र भूला मदें ॥ गौतमनें गांड फाडी आंगपर हुवे फोदे ॥ माया०॥ ॥ ४ ॥ सीताकी चोरी करी रावनकूं धक्का ॥ हनूमाननें नंगी करके जलादियी लंका ॥ माया० ॥ ५ ॥ हनूमान तो ब्रह्म-चारी जपे रामनाम ॥ स्त्रीराजनो बायका गावन करता है बेकाम ॥ माया० ॥ ६ ॥ विश्वामित्र तप करे भये अनुष्ठानी ॥ मेनकानें गांड मारा हुई धूळधानी ॥ माया० ॥ ७ ॥ नार-दनें किसनसे एक औरत मागी ॥ नारदकी नारदी भई पोंगडे

जनन लागी ॥ माया० ॥ ८ ॥ सोळा सहस्र नारी कान्हा गोकुळमें खेळे ॥ राधीकाकूं छोडके रीसनीकूं भूले ॥ माया०॥९॥ जनार्दन सामेरा सब खेळ खेळा ॥ एकनाथ भांड होके रण्डेसि मिला ॥ माया छांड सुनोजी ॥ अच्छा भांड बनोजी ॥१०॥

## ८१ बैरागी.

हमतो बैरागी बैरागी ॥ सुरत रामसों लगी ॥ ध्रु० ॥ भाव तुंबा धरूं ॥ भक्तिकथा नवरंग पेरूं ॥ हा० ॥ १ ॥ प्रेमटोपी सिरकूं ॥ चिन्मय टिळक लगावूं नीरकूं ॥ हा० ॥ २ ॥ केशवदास बैरागी ॥ आशा मनशा माया त्यागी ॥ हमतो० ॥ ३ ॥

## ८२ जागल्या.

जागारे जागल्या भाई ॥ शेत पिकलें नवखंड रोही ॥ पहांट झाली तूं निजलास काई ॥ ध्रु० ॥ मळा रोउनी मेडी चारी ॥ कान्होटगाळ क्रीडा करी ॥ मज धाडोनी पैलथडी ॥१॥ ॥ जा० ॥ चारी कोन्हीं दाही दिशा ॥ शेत पिकलें आलें ब्रह्मरसा ॥ काळ झोडील तूं निजलास कसा ॥ जागारे० ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जागलों ॥ एका सद्गुरु शरण गेलों ॥ जन्मोजन्मींचें दुःख विसरलों ॥ जागारे जागल्या भाई ॥ ३ ॥

## ८३ कापडी.

पहालेरे आजी पहालेरे ॥ संतसंगें सुख आजी जहालें रे ॥

। १ ॥ आह्मी कापडीरे कापडीरे ॥ विघ्नें पळती बारावाटे बा-
ज़ुडीं रे ॥ २ ॥ समता कावडीरे ॥ कावडीरे ॥ माजी नामामृत
भरलें आवडी रे ॥ ३ ॥ येणें ना घडेरे जाणें ना घडेरे ॥ तें रूप
पाहतां कोंदाटलें वहूंकडेरे ॥ ४ ॥ नलगे दंडणेंरे नलगे मुंड-
णेंरे ॥ नाम ह्मणतां कर्माकर्म खंडणेंरे ॥ ५ ॥ सुख फिटलेंरे दुःख
मिटलेंरे ॥ बाप रखुमादेवीवरु विठ्ठलेरे ॥ ६ ॥

## ८४ जोशी ३ रा.

कलियुग खोटें आलेंगा दादा ॥ दुस्तर माणसें मोठींगा
दादा ॥ हातीं धरलें पोटीं गा दादा ॥ झाली आचारहीन सृष्टि
गा दादा० ॥ १ ॥ क्रिया अवघी सांडिलीगा दादा ॥ मागी-
ल रीत मोडलीगा दादा ॥ असत्यप्रिया जोडलीगा दादा ॥
दिवसा मैथुन होतीगा दादा ॥ २ ॥ तस्कर वाटा नेती गा
दादा ॥ स्त्रिया सांडुनी पतीगा दादा ॥ परपुरुषांशीं रमती
गा दादा ॥ ऐसे अवघे वर्ततीगा दादा ॥ ३ ॥ विषयासीं तूं
त्यागींगा दादा ॥ धन इच्छा करिती गादादा ॥ ईश्वर नावडे
गादादा ॥ केशव अनुहात रागेगा दादा ॥ ४ ॥

## ८५ जोशी ४ था.

ऐका ऐका राजश्री ॥ ध्रु० ॥ आह्मी परात्पर जोशी ॥
सांगों आलों संतसभेसी ॥ माझें वचन ऐकारे मानशीं ॥ दृढ

वचनेंसी परिसावें ॥ १ ॥ प्रजासन्मुखपटवाडी ॥ शेटे महाजन चौधरी ॥ बरी नगरी बसविली ॥ २ ॥ याया पंढरींत जोशी आलों ॥ होय सांगोनियां गेलों ॥ माझें नाहीं कोणी ऐकिलें ॥ दगे पावले थोर थोर ॥ ३ ॥ सत्य मानी माझिया बोला ॥ ये थून तुझा शनैश्चर संपला ॥ जन्मगुरूचा पालट झाला ॥ संग घडला साधूचा ॥ ४ ॥ एका बायकोची संगत घडली ॥ त्यानें तुझी महंती बुडाली ॥ शिळी भाकर सरोनि गेली ॥ गांठ पडली दरिद्र्याची ॥ ५ ॥ तिचा संग सांडींरे दादा ॥ बरवा चालेल तुझा धंदा ॥ साच मानी माझिया शब्दा ॥ जेणें सर्वदा सुखी होशी ॥ ६ ॥ विवेक उडदाचा मेळ मिळवावा ॥ संदेह तेलाचा घट भरावा ॥ हृदयीं तांब्याचा पाउड द्यावा ॥ ओंवाळुनी मज जोशाशीं ॥ ७ ॥ जोशी सांगोन जातो होरा ॥ भोळ्या भाविकां लहान थोरां ॥ एकाजनार्दनीं दृढ धरा ॥ जोशी परत गेलियावरी ॥ ८ ॥

## ८६ मुंडा.

समाळयारो उपरतले ॥ दो मारोकी चोट ॥ नजरकरे सारी राखे खाजावे लूट ॥ प्यार खुदाई प्यार खुदाई न्यार खुदाईरे ॥ बाबाजीकी रखुदुवाहीरे ॥ वहाके धुंडू गण चावे ॥ आगल मुक्त न प्यार ॥ लडबड खडबड काहोका ॥ खाक च-

लावत मार ॥ कहे तुका सुनो लोका ॥ हमजीनोंके सात ॥ उसे कहीता हुसे देना ॥ तोही चढावे हात ॥ १ ॥

## ८७ खेळया १ ला.

भीमातीरीं एक वसविलें नगर ॥ त्याचें नांव पंढरपुररे ॥ तेथील मोकाशी चार भुजा त्यासी बायला सोळा हजाररे ॥ १ ॥ नाचत जाऊं त्याचे गांवा खेळया सुख देईल विसावारे ॥ पुढें गेलें ते विधांव झाले वर्णिती त्याची सीमारे ॥ २ ॥ बळी आगळा पाळी लोकपाळा रिघ नाहीं कळिकाळारे ॥ पुंडलिकानें केली पाटिलकी तो झाला दुःखावेगळारे ॥ ३ ॥ दोनी चहाट भरली घनदाट अपार मिळाले वारकरीरे ॥ ना जाऊं ह्मणती आह्मी वैकुंठा जेणें देखिली पंढरीरे ॥ ४ ॥ संतसज्जनीं मांडलें दुकान ज्याला जें पाहिजे तें आहेरे ॥ भक्तिमुक्तिच्या साठीं कोणी न पाहती निजकडेरे ॥ ५ ॥ बहुत दिवस होती मज आस आजी घडले सायासरे ॥ तुका ह्मणे होय तुमचेनि पुण्यें भेटे तया पायांपाशींरे ॥ ६ ॥

## ८८ खेळया दुसरा.

देव छिनालका छिनालका ॥ खेळ खेळाडी बाका ॥ छंद बडा झुरदरका बेटा ॥ जाके झुरकेमें बैठा ॥ १ ॥ बडा धरमका दाता ॥ नहिं जात पात कुच नाता ॥ २ ॥ एकनाथका

वाली ॥ उसकूं कोण देवे गाली ॥ ३ ॥ देव छिनालका ॥ छिनाल्का ॥ खेळ० ॥

## ८९ खेळया तिसरा.

जनीं वनीं एक जनार्दन दाता ॥ त्यासी नमन करूं आतांरे ॥ मन उन्मन जयास पाहतां ॥ त्याच्या चरणावरि माथारे ॥ १ ॥ नाचत पंढरीसी जाऊंरे खेळिया ॥ क्षरातीत पाहूंरे ॥ ध्रु० ॥ टाळमृदंग मेळवुनी मेळा ॥ गुरुवचनीं खेळ खेळारे ॥ २ ॥ भक्ति वैराग्य कुंडलें श्रवणीं ॥ ज्ञानांकुश मुकुट मणीरे ॥ सप्रेम उटी आंगी चंदनाची ॥ सत्वाची कास निर्वाणीरे ॥ ३ ॥ अष्टभावें खेळिये खेळताती ठाई ॥ घागऱ्या वाजती पाईरे ॥ दयाक्षमा दोन्ही चवऱ्या ढळती ॥ शांती सत्रावी छाईरे ॥ ४ ॥ नाद निमाला शब्द खुंटला ॥ त्रिभुवनीं आनंद झालारे ॥ एका जनार्दनीं शरण आला ॥ एकपण विसरला रे ॥ ५ ॥

## ९० खेळया चवथा.

बाराही सोळा गडियांचा मेळा ॥ सतरावा वसवंत खेळियारे ॥ जाते पदराखो जाणे टिपरीया घाई ॥ अनुहात वाजे मोदळारे ॥ १ ॥ नाचत पंढरी ये जाऊंरे खेळिया विठ्ठल रखुमाई पाहूं रे ॥ २ ॥ सां चहुं वेगळा अठरां निराळा ॥

गाऊं वाजवुनी येक चाळारे ॥ विसरती पक्षी चारा घेणें पाणी ॥ तारुण्य देहभाव बाळारे ॥ ३ ॥ आनंद तेथिंचा मुकियासी वाचा ॥ बहिरे ऐकती कानींरे ॥ आंधळ्यासी डोळे पांगुळ्यासी पाय ॥ तुका ह्मणे वृद्ध होती तरणेरे ॥ ४ ॥ नाचत पंढरी जाऊंरे खेळया ॥ विठ्ठल रखुमाई पाहूंरे ॥

## ९१ पोर.

आतां येरे धाकुट्या मुला ॥ कशानें आलें थोरपण तुला ॥ उलीसेंच कींरे दिसतें पोर ॥ ब्रह्मीं नाहीं लहान थोर ॥ तुला ब्रह्म ठाउकें आहे ॥ सर्वांघटीं तेंचि पाहें ॥ ब्रह्मीं नाहीं भेदाभेद ॥ ऐसें बोलती चारी वेद ॥ तुझा भेद गळाला ॥ सद्गुरूनें बोध केला ॥ भेद ह्मणजे कायरे गड्या ॥ आत्मस्वरूप पाहिंरे वेड्या ॥ उलीसेंच पोर वाट मोठे ॥ थोरपण असून वहाड खोटे ॥ माझें मन काय चाहाड झालें ॥ ज्ञानामुळें गर्वाशीं आलें ॥ गर्व जाइल कैशापरी ॥ सद्गुरुचें दास्य करीं ॥ सद्गुरुकृपा तुलाच झाली ॥ भूतें मात्रें भरूनि उरली ॥ तरी काय एक नेलें ॥ अविश्वासी बुडूनि मेले ॥ विश्वास कायसारे केला ॥ हातो निश्चय पुराणीं झाला ॥ सद्गुरुविना तरेना प्राणी ॥ सांगें तरला आहे कोणी ॥ भजन तरी करावें केव्हां ॥ सोहं मंत्रीं नाहीं गोंवा ॥ जावें तरी कोणे दिवशीं ॥ नेम नाहीं

दिवसानिशी ॥ सद्गुरूसी शरण जाइना तरी ॥ चौऱ्यार्शींचे पडशील फेरीं ॥ ज्ञातारपणीं भक्ती करूं ॥ आयुष्य काय तुझें आज्ञा धारू ॥ धाकुटेपणीं भक्ती केली ॥ सद्गुरूची संगत झाली ॥ संगतीनें कोण कोण तरले ॥ महापातकी उद्धरिले ॥ पाहिलें तें कोळ्याचें पोर ॥ अजामेळा चोखा महार ॥ ऐसे तरले कितीएक पोर ॥ मित नाहीं रे गव्हारा ॥ जाबास जाब फार देतोस ॥ बोलूं नये ते बोलतोस ॥ उगाच रहा नाहींतर देईन दोन काठ्या ॥ अहंकाराच्या होशील खोट्या ॥ तुझा माझा वाद झाला कींरे फार ॥ पांच पोरांनीं घेतलें घर ॥ पांच पोरें कोणाचीं ॥ आत्माराम गड्याचीं ॥ सारा खेळ त्याचाच कापरे ॥ खेळ खेळून निराळाच किंरे ॥ हा खेळ तुला कशानें कळला ॥ निवृत्तिरूपें फळाशीं आला ॥

## ९२ महार.

कांरे महारा मदमस्ता ॥ कांहो ब्राह्मणबावा भलतेंच भलतेंच बोलता ॥ तुझे बापाचें भय काय ॥ माय बाप तुमचे न आमचे एकच है ॥ एक ऐसें बोलूं नको ॥ निर्गुणापासून अवघे झालों ॥ निर्गुण तुला काय ठावें ॥ आत्मस्वरूपीं शोधून पहावें ॥ आत्मस्वरूप आह्मा कळेना ॥ नाहींतरी संतांसीं शरण जाना ॥ संतांशीं शरण गेल्यानें काय होतें ॥

चौऱ्यांशींचा फेरा चुकतो ॥ हें ज्ञान तुला कोठशासून प्राप्त जा हलें ॥ ज्ञानदेव ह्मणे निवृत्ति प्रसादें कळूं आलें ॥

## १३ महारीण पहिली.

महारणीचे बोल ऐका ॥ पायां पडते महारीण आली ॥ गांव वसाड पाडूं नका ॥ हकनाक बसेल धका ॥ इतुके तुह्मी मतीं तरका ॥ पायां० ॥ १ ॥ ब्रह्माविष्णु दोन्ही बाळ ॥ महाकाळाचे हे काळ ॥ मज देखतां गोपाळ ॥ ते मज महारणी पासोनी ॥ पायां० ॥ २ ॥ एका जनार्दना महारीण झालें ॥ सद्गुरूला शरण गेलें ॥ त्यानें आपुलें स्वहित केलें ॥ जन्ममरण निवरलें ॥ पायां० ॥ ३ ॥

## १४ महारीण दुसरी.

जोहार मायबाप जोहार धनी ॥ मीनिराकारिची महारिणी ॥ माझ्या धन्यासी निद्रा लागली ह्मणूनी ॥ मी संतसभेसीं आलें कीं जी माय० ॥ १ ॥ माझे धनी एकुलते एक होते ॥ त्यांसी मजवांचोनि कर्मत नव्हतें ॥ मी रात्रंदिस फिरत असतें ॥ परी सत्ता त्यांचीच कीं जी मायबाप ॥ २ ॥ मग मागें टाकून॥ मी आलें धन्याचें मोहें करून ॥ थोर थोर टांगी धरून ॥ ओढोनि आणिले कीं जी मायबाप ॥ ३ ॥ ओढोनि आणले कोण कोण सबळ ॥ त्यांचीं नांवें ऐका तुह्मी सकळ ॥ विश्वा-

मित्रा सारिखें दिसाळ ॥ ओढोनि आणले कीं जी मायबाप ॥ ॥ ४ ॥ ऋषीमध्यें पराशर ॥ तो मजसवें गुरगुर करी फारफार ॥ मग म्यां करून दिवसाचा अंधकार ॥ मग तो म्यां ढिवरींसीं रतविला कीं जी मायबाप ॥ ५ ॥ ऋषिमध्यें मुनी एक नारदु ॥ तो मसीं कधीं नव्हता मरदु ॥ त्याचा द्वारके मध्यें उतरला मद्दु ॥ साठ पोरें व्याला कीं जी मायबाप ॥ ६ ॥ सर्वांमाजी ब्रह्मा परवड ॥ त्यानें मांडली मजसंगें होड ॥ त्यावर घालोनि कन्येचें लिगाड ॥ तो म्यां पस्तावीं पाडिला कीं जी मायबाप ॥ ७ ॥ म्यां छळिलें व्यासाचें शुकदेव पोर ॥ त्यानें माझी निर्भत्सना केली फार ॥ मग काढोन पाईची पैजार ॥ माझे तोंडावर हाणिली कीं जी मायबाप ॥ ८ ॥ अशाअशांच्या अशा केल्या गती ॥ येरचि वायां गेले नेणों किती ॥ मज नागवेउघडे करोनि जिंकू पाहती ॥ त्यांचें तोंडी माती पडो कीं जी मायबाप ॥ ९ ॥ एका जनार्दनीं विनंति करी ॥ जो करी पंढरीची वारी॥तेथें बळ न चाले निर्धारीं ॥ येरव्हीं तरी झाडे दिले कीं जी मायबाप॥१०॥

## ९५ महारीण तिसरी.

पायां पडते महारीण आली ॥ महारीण गेली वरच्या आळी ॥ महारणीनें दिली हारळी ॥ जवळ आली काळाची फेरी ॥ १ ॥

माझें महारणीचें ऐका ॥ जागे असा निजूं नका ॥ काळ करीत-से खेपागा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं महारीण ॥ करा चंद्र-भागे स्नान ॥ घ्यावें पुंडलीकदर्शन ॥ पहावें विठ्ठल चरणगा ॥ पायां पडते महारीण आली ॥ ३ ॥

## ९६ बैरागीण.

हरीसंग लागु बैरागीन होउंगी ॥ध्रुव०॥ दंडकमंडलु कटि मृ-गछाला ॥ रामबयन गळां तुळसीके माळा ॥ हरी० ॥१॥ काया मोरी कंथा मन मोरो जोगी ॥ शामसुंदर जनवारस भोगी ॥ ह० ॥ २ ॥ कहेत कबीरा आंतकी बारी ॥ राम बिना दुःख कोण निवारी ॥ ३ ॥

## ९७ भटीण.

मी भटीण आलें रे भटा ॥ नको करूं रिकाम्या चेष्टा ॥ काय बोलुन्शासी चावटा ॥ उगीच कां करितोसी थट्टा ॥ मी भटीण० ॥ ध्रुव० ॥ म्यां भटणीनें तुज पाळिलें ॥ पाळिल्याचे बरेच उप-कार फेडिले ॥ माझें मज आणून देतां ॥ त्यांत तुझें काय गेलें रे भटा ॥१॥ मजपासूनि वेद कीं रे झाले ॥ ते म्यां तुझ्या हा-तीं दिधले ॥ शंकासुरानें चोरून नेले ॥ माझ्या भयानें ते परत आणिलेरे भटा ॥ २ ॥ त्याच्याच आधारानें मी बोलत आहें ॥ बहु मस्ती आली तुला मला ठाउक आहे ॥ आपलें

अंतर शोधून पाहेंरे भटा ॥ मी भटीण० ॥३॥ ल्हान वा थोर तुला त्यांच रे केला ॥ नव अवतारांच्या हातीं भला ॥ दहावा कलंकी राहिला ॥ तोही जाईल विलयालारे भटा ॥ मी भटीण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भी शरण ॥ भटाचें हरपलें मी पण ॥ उगाच गेला मौन धरून ॥ चैतन्यरूप पाहिलेंरे भटा ॥ मी भटीण०॥५॥

## ९८ कंजारीण

होहोरी होहोरी हो ॥ लेवरे रसी ॥ होहोरीहो ॥ लेने वाला है पर घेणेवाला नहीं ॥ हो० ॥ घेणें वाला है पर ॥ लेणें वाला नहीं हो० ॥ ध्रु० ॥ नीसंग आडती ॥ केतन तोडा ॥ आपकारी पाडवा ॥ आतां सान जोडा ॥ हो ० ॥ १ ॥ तेलंगी वाढवा ॥ फुलाना फुलवा ॥ साधन करवा ॥ मन आशा फेडवा ॥ हो० ॥२॥ फुलावान नवरा ॥ अडती न तंगी ॥ नीतंग कोडता ॥तंगीन अडी ॥ हो० ॥ ३ ॥ जनार्दन पडवा ॥ कंजारी लढवा ॥ कोंकणी करवा ॥ दातारु बरवा ॥ हो० ॥ ४ ॥

## ९९ कोलाटीण पहिली.

आली कोलाटिन खेळाया ॥ सगुण माया ॥ १ ॥ ध्रु० ॥ प्रपंचांत रोंविला वेळू ॥ चौशून्यांत मांडिला खेळू ॥ ब्रह्मा विष्णु

तयाचें बाळ ॥ बांधिले पाया ॥ १ ॥ खेळे निर्गुणाचा को-
लाटी ॥ सोहं शब्द ढोलकें पिटी ॥ उघडी चैतन्याची पेटि ॥
झाली सई बहुत दाटी ॥ चलावें पहाया ॥ २ ॥ श्रीहाट
आउट गोल्हाट ॥ बरवे साधीलें आउटपीट ॥ उघडून चैतन्याचीं
दृष्ट ॥ बरी बोलाया ॥ ३ ॥ कोलाटीन बैसलीसे डोळां ॥
जाणें गुरुपुत्र विरळा ॥ नरहरी ह्मणे पहा विठ्ठला ॥ बरी
बोलाया ॥ ४ ॥

## १०० कोलाटीण दुसरी.

अनादि निर्गुण पूर्ण परात्पर अभेद नमियेला ॥ काया
वाचा मनें शरण गेलों मी त्याला ॥ मूळचा संबंध ठाव ते-
णें मजला दाखविला ॥ ज्ञानअंजन घालुनी प्रवृत्तिमार्ग खुं-
टविला ॥ पूर्ण बोध बोध घोटविला ॥ १ ॥ कोलाटिण झालें ॥
बाई मी कोलाटिण झालें वेळू वेगळें ॥ बाई मी को० ॥
॥ध्रुव०॥ प्रवृत्तीचें वस्त्र फेडुन सुखीं सुखी रिझलें ॥ परात्पर
परपुरुष पाहुन त्यापासीं मी गेलें ॥ अंगसंगती करूनि
त्याचें सुख म्यां हरविलें ॥ अजराअमृत म्यां सेविलें ॥
कोलाटिण झालें ० ॥ २ ॥ आशा मनशा तृष्णा ह्या
तिन्ही मिळविल्या रांडा ॥ भाव चौटा करूनि येथें ला-
वियला झेंडा ॥ करून उलट प्राणाचा क्रोध तो मारिला में-
ढा ॥ मग तोऽहंकार मेंगा त्यांनीं या भुलीवलें सोंगा ॥

को० ॥ ३ ॥ मागें सारून पायें मारिलीस उफराटी उडी ॥ भ्रांती लुगडें फिटोन गेलें काया झाली उघडी ॥ दुरोनि आणूं भाव मिळूनि येथें मांडिली फुगडी ॥ झाली द्वैतपणाची घडी ॥ को० ॥ ४ ॥ परद्वार म्यां केलें जन्म सार्थक झालें ॥ पंचवीस दादुले हातीं म्यां धरूनि उठविले ॥ अंतरगृह सांवलींत येउनि निश्चळ बैसलें ॥ एकाजनार्दनीं एकीं एकपण मुरलें ॥ जन्मजरामरण हरलें ॥ को० ॥ ५ ॥

## १०१ कोलाटीण तिसरी.

आलि कोलाटिण खेळाया ॥ सगुण माया ॥ आली कोलाटिण० ॥ ध्रु० ॥ अगोदर जीवेश्वर कल्पिले नंतर बद्धमुक्त ठरविले ॥ विषयी मुमुक्षु झाले ॥ कितिएक होतिल आहेत मेले ॥ ईशापुढे जीव लाविले भजन कराया ॥ आलि कोलाटिण खेळाया ॥ १ ॥ आगम निगम गुरूच्या संगें ॥ होउनि प्रपंच विषयीं नंगे ॥ सच्चित्सुखस्वरूपीं रंगे ॥ मायाकृत भवभय हें भंगे ॥ तूं ब्रह्मब्रह्म तव अंगें ॥ मृगजल माया ॥ आ० ॥ २ ॥ विष्णु रुद्र बेल बोटवाती ॥ देवापुढें नित्य उजळीती ॥ उपटुनि कान गाल दोहातीं ॥ शतशा नमन करुनी गाती ॥ आपण देव न जाणुनि जाती ॥ दगड पूजाया ॥ आलि कोलाटिण० ॥ ३ ॥ एका धोतर रेशिमकांठी ॥ एका न मिळे

धड लंगोटी ॥ एकापुढें सलामी दाटी ॥ एका पोरें लागती पाठी ॥ हरिहरनाम धरारे कंठीं ॥ भव शमवाया ॥ आलि कोलाटिण० ॥ ४ ॥ सदसद्रूप वासना होती ॥ देहीं पुण्य पाप घडविती ॥ होणार जें दुःख सुख होती ॥ ज्ञानें समूळ फिटली भ्रांती ॥ ब्रह्मनिष्ठा ब्रह्मचि गती ॥ समाधी ठाया ॥ आलि कोलाटिण० ॥ ५ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध ॥ यांचा सदा लागला छंद ॥ नाठवि मनीं सच्चिदानंद ॥ आपण पूर्ण सुखाचा कंद ॥ करूंनको नानापरिचा फंद ॥ युवति भोगाया ॥ आलि कोलाटिण० ॥ ६ ॥

## १०२ गौळण पंचरंगी पहिली.

आल्या पांच गौळणी पांच रंगांचे शृंगार करुनी ॥ ध्रु० ॥ पहिली गौळण रंगसफेत जशी चंद्राची जोत ॥ गगनीं चांदणी लखलखित ॥ ऐका तिची मात ॥ मंथन करीत होती दारांत ॥ धरून कृष्णाचा हात ॥ ऐशा नटून० ॥ आल्या पांच गौळणी ॥ १ ॥ दुसरी गौळण भाळी भोळी ॥ रंग हळदीहून पिंवळी ॥ पिंवळा पीतांबर नेसुन आली ॥ आंगीं बुट्टेदार चोळी ॥ एक लहान तनू उमर कवळी ॥ जशी चांफ्याची कळी ॥ ऐशा० ॥ आल्या पांच गौळणी ॥ २ ॥ तिसरी गौळण रंग काळा ॥ नेसुन चंद्रकळा ॥ काळें काजळ लेवुन डोळां ॥

रंग तिचा सांवळा ॥ काळी गरसोळी लेउन गळां ॥ आली राजस बाळा ॥ ऐशानद ० ॥ ३ ॥ चवथी गौळण रंग लाल ॥ लाल लालही लाल ॥ कपाळीं कुंकूचिरी लाल ॥ भांगीं भरून गुलाल ॥ मुखीं विडा रंग लाल ॥ जसें डाळिंबीचें फूल॥ ऐशा० ॥ आ०॥ ४ ॥ पांचवी गौळण हिरवा रंग ॥ अवघ्या झाल्या दंग ॥ हिरव्या कांकणाचा पहा रंग ॥ आरशींत जडलें भिंग ॥ फुगडीं खेळती कृष्णासंग ॥ एकनाथ आभंग ॥ ऐशा आल्या त्या नटोनी ॥ आल्या पांच गौळणी ॥ ५ ॥

## १०३ पंचभाषेची गौळण.

गौळणी ठकवील्या ॥ गौळणी ठकवील्या ॥ एक एक संगतीनें ॥ मराठी कानडीया ॥ एक मुसलमानी ॥ कोंकणी गुजरणी ॥ अशा पांचिजणी ॥ गौळणी ठकवील्या ॥ ध्रु ० ॥ गौळणी सुंदरी ॥ गौळणी सुं० ॥ गेल्या यमुनेतीरीं ॥ वस्त्रें फेडुनियां ॥ स्नान करिती नारी ॥ गोविंदानें वस्त्रें ॥ नेलीं कळंबावरी ॥ स्नान करोनियां ॥ त्या आल्या बाहेरी ॥ गौळणी ठकवील्या ॥ गौ० ॥ १ ॥ लडोबा गोविंदा ॥ लडो ० ॥ नीरवाणी आज ॥ आडच्याल्लो पडच्याल्लो ॥ शीरफोड्या न फोडो ॥ मारी कन्हैया पानी ॥ खेळ्या न खेळो ॥ गौ ० ॥ २ ॥ देखरे कन्हैया, ॥ दे० ॥ मैं इज्यतकी बडी ॥ कदम पकडूंगी ॥

मैंयाकुटोजडी ॥ मेरी चुनरी दे ॥ मेरी ले दुल्लडी ॥ गौळणी ठ० ॥ ॥ ३ ॥ देवकिनंदना ॥ दे० ॥ तूं एक श्रीपती ॥ उघडी हिंवाचीं ॥ तुजविनवूं कीती ॥ पांया पडतों बा ॥ मी येतें काकुळतीं ॥ माझी साडी दे ॥ घे नाकाचें मोतीं ॥ गौळणी ० ॥ ४ ॥ पाव गा दाताला ॥ तूं नंदाचो झीलो ॥ माकां कडको दी ॥ मी हिंवान मेलों ॥ घे माझो कोयतो ॥ देवा पायां पडलों ॥ गौळणी० ॥ ५ ॥ ज्योरे माधवजी ॥ ज्योरे ० ॥ मे शरण थई ॥ तनऱ्या काकैपी ॥ बाप दयाळ तूही ॥ मारी साडी आपो ॥ हातणी ले कंगणी ॥ गौळणी ठ० ॥ ६ ॥ इतुकें ऐकुनी ॥ इतुकें ऐ० ॥ देव बोले हांसोनी ॥ सूर्या दंडवत ॥ करा कर जोडुनी ॥ नामा विनवीतो ॥ ह्मणे सारंगपाणी ॥ गौळया ऐक तूं ॥ धन्य तुझी करणी ॥ गौळणी ठक० ॥ ७ ॥

## १०४ गौळण बोबडी तिसरी.

जात होतें पानियां तेथें भेतला सांवला ॥ दोयवलतो मयुलपिच्छांसी खांद्यावली कांबला ॥ १ ॥ काय थांगु तूंतें बाई ॥ काय थांगुं तूंतें० ॥ ध्रु० ॥ घुलगें माझें फुतलें मग मी ललत बैसलें ॥ कुनिकुन आला साळंगपाणी मला पोतासी धलिलें ॥ काय थांगुं तूंतें० ॥ २ ॥ मला पोतासी धलिलें सुख मोतें वातलें ॥ निवऱ्तीचे किलपे कलुनी ज्ञानदेवा लाथलें ॥ काय थांगुं तूंते० ॥ ३ ॥

## १०५ गौळण चवथी.

दुडिवरि दुडि गौळणी साते निघाली ॥ गौळण गोरस ह्मणों विसरली ॥ १ ॥ गोविंदु घ्या कोणि दामोदर घ्यागे ॥ तंव हांसती मथुरेच्या गे ॥ ध्रु० ॥ दुडिया माझारी कान्होबा झाला भारी ॥ उचंबळे गोरस सांडे बाहेरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं सबळ सगौळणी ॥ ब्रह्मानंद न समाये मनीं ॥ ३ ॥

## १०६ गौळण पांचवी.

गोरस घेउनी सात निघाल्या गौळणी ॥ तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें ॥ झाला पानसरा भिठी घातली पदरा ॥ आधीं दान माझें सारा मग चला पंथें ॥ १ ॥ सर जाउंदे परता ॥ मुळीं भेटलासी आतां ॥ नाट लागला संचिता खेपा खुंटलिया ॥ ध्रु० ॥ आसडी पदरा धरि आणिक दुसरा ॥ येरी झोंबती करा काय वेडा होसी ॥ आलों गेलों बहुवेळा ॥ नेणों गोरा कीं सांवळा ॥ सर परता गोंवळा काय बोलतोसी ॥ २ ॥ आह्मी येथें अधिकारी ॥ मागें केली तुझी चोरी ॥ आतां कळलियावरी मागे केलें त्याचें ॥ बोलिल्या हांसोनी ॥ आह्मी सासुरवासिनी ॥ कांरे झोंबसी दुरोनी ॥ करी मात कांहीं ॥ बा या परनारी कैशा धरिशी पदरीं ॥ तया कळलियावरी ॥

तुजमज नाहीं जडला जिव्हारी ॥ फाकों नेदी तयानारी ॥ जेथें वर्म तें धरी जाउं पाहे तियेचें ॥ ४ ॥ तया हातीं सांपडल्या हाटी पाठी ॥ चुकविल्या कृष्ण मिळणी मिळाल्या त्याही न फिरती ॥ तुका ह्मणे खंती वायां न धरावी चित्तीं ॥ होतें तुमच्या संचितीं वोढवलें आजी ॥ ५ ॥

## १०७ सौरी पहिली.

सौरी झालें बाई, आतां नाहीं येथें कांहीं ॥ आतां ना० ॥ ध्रु० ॥ होउनि वेडी घाली फुगडी ॥ गलोगलीं नाचे ॥ गलोगलीं नाचे ॥ मागें पुढें रुंदावलें झालें गणोबाचें ॥ १ ॥ होउनि उघडी घाली फुगडी जाउनि राउळांत ॥ संतसंग जाहल्यावरी पुरेल तुझा हेत ॥ २ ॥ तुका ह्मणे सौरी झालें दादला मेला भ्याला ॥ संग नसतां पोरें झालीं काय सांगूं तुला ॥ ३ ॥

## १०८ सौरी दुसरी.

मी सुखाची कन्या झालों, वाढविली घरीं वाढविली घरीं ॥ देखतां पाहतां उचलुनि नेलीं चोरीं ॥ उचलुनि० ॥ १ ॥ सौरी झालें बाई आतां करूं तरी काई, करूं तरी काई ॥ ॥ ध्रु० ॥ निजसुखाचा पुत्र झाला जावा नणंदा घरीं ॥ जावा नणंदा घरीं ॥ पाहतां देखतां उचलुनि नेलीं चोरीं ॥ उचलुनि नेलीं चोरीं

॥ २ ॥ बारा सोळा मुलें झालीं आले सुना नातू, आले सुना नातू ॥ शक्ति सर्व निघून गेली कंबरेवरि हातू ॥ कंबरेवरि हातू ॥ ३ ॥ कैंची बहिण कैंची माय अंतकाळीं देखा ॥ अंतकाळीं देखा ॥ निदानीचे वेळीं तुज देव मारी हाका ॥ देव मारी हाका ॥ ४ ॥ लेकुरवाळी बाइल ह्मणे तोंड याचें झांका ॥ तोंड याचें झांका ॥ एका जनार्दनीं दास विनवितो तुका ॥ विनवितो तुका ॥ ५ ॥

## १०९ सौरी तिसरी.

सौरी झालें बाई आतां करूं गत काई, करूं गत काई ॥ ॥ ध्रु० ॥ बसवी झालें बाई आतां भिन्न भेद नाहीं, भिन्न भेद नाहीं ॥ १ ॥ कासरा लावुन सासरा मारला दादला टाकुन आलें ॥ आत्मालिंग पाहुनियां मगरमस्त झालें, मगरमस्त झालें ॥ २ ॥ बांधुन बुचडा उघडा माथा विभूतीचा पट्टा ॥ आला गेला ह्मटला नाहीं धरल्या चारी वाटा, धरल्या चारी वाटा ॥ ३ ॥ उभी शिंदळ घाली गोंधळ हाचि लाभ मोठा, हाचि लाभ मोठा ॥ मागें पुढें पाहूं नका ॥ वेगें काम लाटा, वेगें काम लाटा ॥ ४ ॥ लहान थोर ह्मटला नाहीं जहालेंशी वेडी, जहालेंशी वेडी ॥ तुका ह्मणे बसवी झालें परद्वार गोडी, परद्वार गोडी ॥ ५ ॥

## ११० सौरी चवथी.

सौरी झालें बाई आतां करूं गत काई, करूं गत काई ॥ ॥ ध्रु० ॥ अठवे परते निटवे झाले दिवा मार्गे सारा ॥ दिवा मार्गे सारा ॥ हातां पायां टिपरी लागे भुंगळ घेती वारा ॥ भुंगळ घेती वारा ॥ १ ॥ भावार्थाचें झालें गेलें गेलें संतापाशीं ॥ गेलें संतापाशीं ॥ ज्ञानडोर घेउन हातीं लिंगदेह जोशी ॥ लिंगदेह जोशी ॥ २ ॥ पांच गाथ तीन मावे त्यांवर निजलें होतें ॥ फटफटीत उजाडलें खाटलें पडलें रितें ॥ खाटलें पडलें रितें ॥३॥ कर्म नेणों धर्म नेणों नेणों आह्मी कांहीं ॥ नेणों आह्मीं कांहीं ॥ ज्ञानदेव ह्मणे आह्मां जाणें येणें नाहीं ॥ जाणें येणें नाहीं ॥ चाल माझ्या विठू आतां तुह्मी आह्मी भेटूं ॥ तुह्मी आह्मी भेटूं ॥ ४ ॥

## १११ सौरी पांचवी.

धन्य झाली भेटी ॥ नाचूं वाळवंटीं ॥ ध्रु० ॥ सौरी झालें भलें केलें मज पांडुरंगें ॥ मज पां० ॥ संसार घोर सांडून दूर नेलें आपल्या संगें ॥ १ ॥ एकाएकीं महा सुखीं निजलें एका सेजे ॥ निजलें० ॥ अवघा सखा दावी लोकां नाहीं दुजें माझें ॥ नाहीं० ॥ २ ॥ तुकया ह्मणे नलगे येणें पुन्हां या संसारा ॥ पुन्हां० ॥ तिळांजुळी देऊनियां नामीं केला थारा ॥ नामीं ॥३॥

## ११२ सौरी सहावी.

सहा दादुले केले परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ काया वाचा रमलें त्यासीं ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ ध्रु० ॥ १ ॥ नग्न होउनि भोगिला पुरुष म्यां ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ देतो गोडगोड खाया परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ २ ॥ केला संसार गोड परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ याचे मनाची पुरविली खोड परी म्यां ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ ३ ॥ ऐसी नवरी झालें परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ एका जनार्दनीं नमिलों पायीं ऐसा नाहीं देखिला दादूला ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ ४ ॥

## ११३ अंबाबाई.

तूं विटेवरि सखये बाई हो करीं कृपा ॥ माझें मन लागो तुझ्या पायीं हो करीं कृपा ॥ तूं सांवळे सुंदरी हो करीं कृपा ॥ लावण्य मनोहरी हो करीं कृपा ॥ निजभक्त करुणाकरी हो करीं कृपा ॥ ( चाल ) पंढरपुरीं राहिली ॥ डोळां पाहिली ॥ संतें देखिली ॥ वद्धन विठाई वद्धन विठाई ॥ सच्चिदानंदें अंबाबाई

हो करीं कृपा ॥ करीं कृपा उजळि कुळदिपा, बोधकरीं सोपा येऊन लवलाई ॥ येऊन लवलाई ॥ सच्चिदानंदे अंबाबाई हो करीं कृपा ॥ १ ॥ तुझा देव्हारा मांडिलाहो करीं कृपा ॥ चौक आसनीं कलश ठेविला हो करीं कृपा ॥ प्रेमचांदवा वर दिधला हो करीं कृपा ॥ ज्ञानगादी दिली बैसावया हो करीं कृपा ॥ वर बसविली आदिमाया हो करीं कृपा ॥ प्रेमपुष्पें आणिलीं पूजावया हो करीं कृपा ॥ ( चाल ) काम क्रोध मद मत्सर ॥ दंभ अहंकार ॥ त्यांचें बळ फार ॥ सर्व सुख देई, सर्वसु० ॥ सच्चिदानंदे अं० करीं कृपा, उजळिं कुळदिपा बोध करीं सोपा, येऊनि लवलाई येऊनि सच्चिदानंदे० ॥ २ ॥ शुक सनकादिक गोंधळी हो करीं कृपा ॥ नाचताती प्रेमकल्होळीं हो करीं कृपा ॥ उदे उदे शब्द आरोळी हो करीं कृपा ॥ पुढें पुंडलीक दिवटा हो करीं कृपा ॥ त्यानें मार्ग दाविला नीट हो-करीं कृपा ॥ आई दाविली मूळ पीठा हो करीं कृपा ॥ ( चाल) बाप रखुमा देवीवरू ॥ सुखसागरू ॥ त्याला नमस्कारूं ॥ सर्व सुख देई, सर्वसु० ॥ सच्चिदानं० ॥ करीं कृपा ॥ उजळिं कुळदिपा ॥ बोधकरीं सोपा ॥ येऊनि लवलाई ॥ येऊनि लव-लाई ॥ सच्चिदानंदे अंबाबाई हो करीं कृपा ॥ ३ ॥

## ११४ मरीआई.

कनगुळी भानगुळी सुप टोपली ॥ आदिमाया नमो भग

वती ॥ मानवी हो काय करून ठेविलीये ॥ निवांत देखिलीये ॥ १ ॥ मरी आईचा कोरडा वाजतो ॥ सिंव्हेवरी कोरडा वाजतो ॥ गाड्यावरी कोरडा वाजतो ॥ ध्रु० ॥ चारी पुरुषार्थ प्रसंगीं घालुनी ॥ निरंजनीं पुंडलिकाचे द्वारीं बैसोनी ॥ भक्ती पुरस्करोनी ॥ निवांत देखिलीये ॥ २ ॥ मच्छे कच्छे वऱ्हाडे नारासिंहे वामने परसेरामे कृष्णे बौध्ये कलंकीये ॥ ३ ॥ सीते जान्हवीहो ॥ वैष्णवकुळाचा उद्धार करोनी ॥ चौवर्णांचे मळवट भरोनी ॥ ४ ॥ अठराजनांची रांडोळी करोनी ॥ गाढे हढ दैत्यांची आहुती घेउनी ॥ बळी बगाडे तुजला देउनी ॥ ५ ॥ अनुहात ब्रह्मांडें तुझा देव्हारा ॥ ह्मणुन तुला अर्पिला माय तरुवरा ॥ लिंबें घेउनी नारळे मारा ॥ ६ ॥ ऐसी पूजीयेली नरतनू ॥ भक्तासी करिसी विनवणू ॥ तैसें नव्हेरे ज्ञान अंजनू ॥ प्रसन्न होउनीये खेळी प्रपंचभानू ॥ ७ ॥ अज्ञान करसी मायठेंगणीं ॥ त्या तरुवराचे पाणे ॥ आवडी स्वयंभूकानें वानें मौन व दुखणें ॥ जनार्दनीं करोनी मन ॥ एकाजनार्दनीं अंबे तुजला पांगीलें जन ॥ ८ ॥ अंबाअंबिका प्रसन्न होउनी ॥ वैष्णवासी दर्शन देउनी ॥ सांवळें रूप प्रगटोनी ॥ वैष्णवांमाजी गर्जोनी ॥ सिंहनादें एकाजनार्दनीं भरोनी ॥ अंबा निवांत राहिलीये ॥ मरी आईचा कोरडा वाजतो ॥ गाड्यावरी कोरडा वाजतो ॥ सिंव्हेवरी कोरडा वाजतो ॥ ९ ॥

# ११५ कैकाडणी.

कैकाई कैकाई दुरील माझा देश ॥ अलक्षपूर नगरतेथें आह्मा रहिवास ॥ सहज आह्मी बीज केलें शकुन सांगायास ॥ सांगिजेल तेथें दादा धरिं पाय विश्वास ॥ ध्रु० ॥ प्रथमचि मी तव दादा केकाडिन झालें ॥ जेथिंचें तेथिंचें येथें अवघें संचलें ॥ होतां घडमोडी नाहीं स्वरूप कालवलें ॥ कैकाई० ॥ १ ॥ काळाई गौरी आई नव्हे सांभळाई ॥ मच्छाई कूर्माई नव्हे बवाई नरसाई ॥ वामनाई परशाई नव्हे रामाई कृष्णाई ॥ बौद्धाई कलंकाई नव्हे शकुन सांगों काई ॥ कैकाई०॥ २ ॥ दिसे तें तें भूर दादा सांगों काय अंतीं ॥ चंद्र सूर्य क्षणामाजी भूर होउन जाती ॥ चौदा मन्वंतरे दादा तींही भूर होती ॥ पाहतां अवघें दादा भूर अनुभवप्रचीती ॥ कै० ॥ ३ ॥ कैकाई कैकाई ऐसें बोलती घरोघरीं ॥ कैकाई कैकाई ऐसे कोणी न विचारी ॥ वन्यधान्य पुत्रपौत्रीं हाची सोसभारी ॥ विषय लोभासाठीं दादा ठकल्या नरनारी ॥ कै० ॥ ४ ॥ सहज परिस दादा सांगेन हितगुज गोष्टी ॥ सांडुनियां मायाजाळ राहे निजदृष्टीं ॥ सद्गुरुरूपें केशवराजी कैकाईसी भेटी ॥ एकांतीं लोकांतीं पडली निजवस्तुशीं मिठी ॥ कै० ॥ ५ ॥

## ११६ ठकडी.

शामसुंदर सांवळी ॥ उभी जणूं असे राउळीं ॥ ती आकाश ब्रह्मांड गिळी ॥ दादांनों ठकडी बायको आली ॥ भल्याभल्यासीं ठकउन गेली ॥ दादांनों ठ० ॥ ध्रु० ॥ चारी शून्यांचे वरती ॥ ज्ञानदृष्टीनें न्याहाळिती ॥ चारी सूत्रें तिचे हातीं ॥ दादांनों ठ० ॥ १ ॥ बायको नव्हे पुरुष नव्हे ॥ दावी नानारंग नटभाव ॥ जैसी आकाशीं वीजबालवे ॥ दादांनों ठ० ॥ २ ॥ जे जे पाहूं गेले तिसीं ॥ तिनें झोडपिलें तयांसी ॥ तुकाराम शरण तिशीं ॥ दादांनों ठ० ॥ ३ ॥

## ११७ मुलगी.

आरति येग धाकुटे मुली ॥ हीव कांग तुमची बोली ॥ घरा दाराची हित करते ॥ फुटक्या मडक्याचें भोंक बुजविते ॥ अटक मटक नऊ वाटा ॥ येऊन वसे दास दारवंटा ॥ दास दारवंटा ते कोण ॥ तुझ्यांत गेले दोन ॥ फटक माझे सवती ॥ तुला सहाजण झोंबती ॥ पडले षड्विकाराच्या हातीं ॥ षड्विकार कशानें जाती ॥ सद्गुरूचे पाय धर चित्तीं ॥ सद्गुरु काय देइलग मला ॥ तन मन धन अर्पण करीन तुला ॥ संसार जाईल सारा ॥ उद्यां येईल काळाचा फेरा ॥ आह्मी नरनारी पतिव्रता ॥ विष्णूवर करूं सत्ता ॥ मुक्ताबाईनें केला संग ॥ योगी खेळविला पांडुरंग ॥ १ ॥

## ११८ वऱ्हाडणी.

आलिया वऱ्हाडणी बैसा लिंपाटेंकी ॥ कोणता नवरा कोणि ना ओळखी ॥ १ ॥ मी कोणाची मज सांगा कोणी ॥ वऱ्हाड आलिया वऱ्हाडणी ॥ २ ॥ कोणती वरमाय कोणता वरबाप ॥ कोणता नवरा कोणता मंडप ॥ ३ ॥ वऱ्हाड नव्हे हें स्वप्नगे माय ॥ बापरखुमादेवीवर धरा विठ्ठलाचे पाय ॥ ४ ॥

## ११९ लग्न.

हळद वाटू वाटिला पाटा ॥ अवगुणाचा नवरा हळदीनें उटा ॥ १ ॥ नागवा नवरा नागवी नवरी ॥ दोघें बैसलीं च रावरीं ॥ २ ॥ नागव्या नवऱ्यानें नवरी नेसिला ॥ नागव्य नवरीनें नवरा वेढिला ॥ ३ ॥ सेजमंडपीं दोघेंचि दोघें ॥ एकाजनार्दनीं नाचती भोगें ॥ ४ ॥

## १२० टिटवी.

टिटवी यमाची तराळीन ॥ ध्रु ० ॥ एका गांवावर नाहुन ॥ एका नदींत विहीर पाहुन ॥ तेथें टिटवी करी शयन ॥ दोन्हीं पायांत खडा धरून गा ॥ १ ॥ मरे चवगुल्याची सुन ॥ पाटलाचे चौघेजण ॥ कुळकर्ण्याची लाडकी सुन ॥ आतां गांवांत राहिले कोण गा ॥ २ ॥ देशमुख देशपांडे चौधरी ॥ त्यांची गणना कोण करी ॥ शेलकी देशमुखाची पोरी ॥ आतां

गांवांत नाहीं थोरी गा ॥ ३ ॥ कोणी कोणासी नाहीं जाण ॥ आतां नाहीं कोणाचें कोण ॥ शेवटीं नेऊन मारीन ॥ माझे संग एक कामीन ॥ एका जनार्दनीं थोरपणगा ॥ टिटवी० ॥ ४ ॥

## १२१ पिंगळा.

पिंगळा महाद्वारीं ॥ बोली बोलतां देखा ॥ डौर फिरवीतो ॥ डुगडुग ऐका ॥ ध्रु० ॥ वरल्या आळीला ॥ तुह्मी सावध रहावें ॥ पाटीलबुवाला ॥ मग लावून सवें ॥ चिठ्ठी येइल बा ॥ मग पडेल ठावें ॥ १ ॥ मधल्या आळीला ॥ एक बायको फिरे ॥ तिजला तुम्ही साधा ॥ मग पडेल पुरें ॥ नाहींतरी पाटलोबा ॥ तिचीं पळतील गुरें ॥ २ ॥ आणिक एक बारे ॥ सुटेल तांत-डी ॥ पाटीलबुवाची मग पडेल माडी ॥ तिचीं पांच पोरें ॥ लागतील देशोधडी ॥ ३ ॥ आणिक एक ऐका ॥ कैंचें नवल झालें ॥ गांवच्या पांड्यांनीं ॥ पाटलास नागविलें ॥ साऱ्या कागदाचें ॥ शून्य एकच केलें ॥ ४ ॥ हिंडतां फिरतांना एक शकून सांगे ॥ त्याच्या सत्तेनें ह्मा आळीस वागे ॥ संतां घरचा बा ॥ एक तुकडा मागे ॥ ५ ॥ हें जरी न ऐकाल ॥ तरी दुसरा येईल ॥ सरतेशेवटीं बा ॥ काळ बांधून नेईल ॥ काळा ह्मणेबा ॥ आमचें काय जाईल ॥ ६ ॥

## १२२ बुलबुल.

लखो बुलबुल है ॥ हवाजे तुमें मुबारखा ॥ ध्रु ॥ झूटा तेरा जप ॥ भातरोटी गप ॥ सद्गुरुमें चप ॥ तुझे काल करेगा गप ॥ लखो बुलबुल है ॥१ ॥ लागे सोंमे लिया नाम ॥ हे जी सदा भरे काम ॥ भला आशा बेफाम ॥ तुझे कहां मिलेगा राम ॥ लखो० ॥ २ ॥ मुकू आंगकूं लगाया राख ॥ आत्मा होवेगी नापाक ॥ भला आशा डुबलगे ॥ एका जनार्दनका बंदा ॥ लखो बुल० ॥ ३ ॥

## १२३ वटवाघूळ.

पूर्वीं पंगतीस केला भेद ॥ नाहीं अंतःकरण शुद्ध ॥ झाले वटवाघूळ प्रसिद्ध ॥ वटवाघूळ झालें बाई ॥ करावें काई ॥ उपाय नाहीं ॥ वटवाघूळ० ॥ ध्रु० ॥ १ ॥ वटवाघळाचा जन्म घेऊन ॥ घेतलें उफराटें टांगून ॥ तोंडीं नरक भरला जाण ॥ वटवाघूळ० ॥ २ ॥ वटवाघळीची यातना मोठी ॥ भोगिल्या लक्ष चौऱ्यांशी कोटी ॥ जन्ममरणाच्या तुटल्या गांठी ॥ वट० ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वटवाघूळ झालें ॥ सद्‌गुरुला शरण गेलें ॥ जन्ममरण चुकविलें ॥ वटवाघूळ झालें बाई ॥ ४ ॥

## १२४ काऊ.

पैल तो काऊ कोकतसे ॥ शकूनग माय सांगतसे ॥ ध्रु०॥

उड उडरे काऊ ॥ तुझे सोन्यानें मढवीन पाऊ ॥ पाहुणे पंढरिराऊ ॥ घरीं कैं येती ॥ १ ॥ दहीं भाताची उंडी ॥ लाविन तुझ्या तोंडी ॥ जीवा पडीवळ्याची गोडी ॥ सांग वेगीं ॥ ॥ २ ॥ दुधा भरून वाटी ॥ लावीन तुझे ओंठी ॥ प्रत्यक्ष सांग गोष्टी ॥ विठू येईल कैं ॥ ३ ॥ आंबीया डाहाळी ॥ फळें चोखी रस आंवळी ॥ आजींचे रे काळीं ॥ शकून सांगें ॥ ४ ॥ ज्ञानदेव ह्मणे ॥ जाणिजे येणें खुणें ॥ भेटू पंढरीराणे ॥ शकून सांगे ॥ ५ ॥

## १२५ मैना.

तोती मैना राधे कृष्ण ॥ तोती मैना राधे कृष्ण ॥ राधे कृष्ण बोल ॥ तोती राधे कृष्ण बोल ॥ ध्रु० ॥ येकही तोती धुंडत आई ॥ लाकटकी बानी मोल ॥ तोती मै० ॥ ॥ १ ॥ दाना खावे तोती पानी पीवे ॥ पिंजरेमें करित कल्लोळ ॥ तो० ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ हरिके चरण चित्त डोल ॥ तोती० ॥

## १२६ पोपट.

पढो माझ्या आत्माराम ॥ राधा कृष्णाचें हें ध्यान ॥ पिंजऱ्यामध्यें गुंतलासी ॥ तुज सोडवील कोण ॥ पढो० ॥ ध्रु० ॥ चौऱ्यांशी लक्षयोनी ॥ वनीं तूं तरि हिंडशी ॥ प्रमदाविषफळीं ॥

अतित्वरें धांव घेसी ॥ येऊनियां दोनी पक्षी ॥ पहाती तुज न्यावयासी ॥ पढो मा० ॥ १ ॥ पिंजरा घडवीला ॥ पंचभूतांचा कुसरी ॥ नवद्वारें सोळा सांधें ॥ प्रभा पडली भीतरीं ॥ लाविली प्राचीनाची दोरी ॥ बांधिला निजमंदिरीं ॥ पढो मा० ॥ २ ॥ हिरवा तुझा रंग ॥ गुंजावर्ण दोनी डोळे ॥ चोंच आहे तुझी लाल ॥ बोल तुझा हा मंजूळ ॥ राघवा तूं बोल माझ्या ॥ सख्या अमोलिक बोल ॥ पढो० ॥ ३ ॥ अचल तूं चंचल मोठा ॥ हिंडे तीनही ताळ ॥ तुला जपला काळ बोका ॥ केव्हां घालिल गळ ॥ जरी जाशी उडोनीयां ॥ पूर्व सुकृताचें फळ ॥ पढो० ॥ ॥ ४ ॥ सत्यगुरु दत्तदाता ॥ तारक मंत्र तुज देई ॥ तोच तुला सोडवील ॥ यम करील कायी ॥ पावशील चिंतामणी ॥ स्वामी तुकोबाचे पायीं ॥ पढो मा० ॥ ५ ॥

## १२७ पाखरूं.

कृष्ण एक पांखरूं आहे ॥ तें मुखावीण चारा खायरे ॥ डोळे नाहीं परि तें पाहे ॥ वाचेविण सोय गायरे ॥ १ ॥ सख्या त्याचें नांव कान्होबा कृष्ण ह्मणती सबरे ॥ त्याचें वास्तव्य कोठें आहे पर नाहीं परि तें उडेरे ॥ २ ॥ तिहींलोकीं हिंडतें त्रिभुवन त्याला थोडेंरे ॥ त्याचे नखांत आकाश बुडे ॥ तें सन्मुख चहूंकडेरे ॥ ३ ॥ अहो त्याला मायबाप दोन्हीं नाहींरे ॥ एकपणेंविण पाहती जनार्दनाचे पायरे ॥ ४ ॥

## १२८ कुत्रें.

येरे कुत्तुये ॥ आह्मा विटाळ करूं नको ॥ आपली भाकर घे॥ देरे धन्यादे ॥ विटाळ राहिला तुजखालीं ॥ आवरून आपला घे ॥ आतां हें कुत्रें मातलें ॥ मीच ह्मणुनी गुंतलें ॥ फार गांड मोठी केली ॥ जीवा तुझी खोटी झाली ॥ उपाशीं मरतो पाहे बरें ॥ अमृताचें अंग सारें ॥ धर एक सकाळ काय खाशी ॥ तूंच मुद्दल कोठें रहासी ॥ एवढें ज्ञान झालें कोठें ॥ सद्गुरूचें देणें मोठें ॥ सद्गुरु तुला आहे कारे ॥ सर्वांघटीं तोचकींरे ॥ आह्मी तर ह्मणतों कुत्रा तुला ॥ अविद्येनें धत्तोरा दिला ॥ ब्राह्मणासी अविद्या ह्मणसी ॥ देह ब्राह्मण कैसा होसी ॥ श्रेष्ठ जन्म वेद बोलती ॥ एवढे भले तरी कां मरती ॥ हरीभक्त अमर होती ॥ अमर होती तें कळे कैसें ॥ आपण व्हावें तैसें ॥ तैसा होईनासी कांरे ॥ जात गोत पाहिनाशीं कींरे ॥ हें ज्ञान तुला कशानें झालें ॥ ज्ञानदेव ह्मणे निवृत्तिकृपें कळों आलें ॥१॥

## १२९ विंचू

विंचू चावला वृश्चिक चावला ॥ कामक्रोध विंचू चावला ॥ तम घाम आंगासि आला ॥ ध्रु० ॥ पंचप्राण व्याकुळ झाला ॥ त्यार्णे माझा प्राण चालला ॥ सर्वांगाचा दाह झाला ॥ विंचू चा० ॥ १ ॥ मनुष्य इंगळी अतिदारुण ॥ मज नांगा मारला

तिन ॥ सर्वांगीं वेदना जाण ॥ त्या इंगळीची ॥ २ ॥ ह्या विंचवाला उतारा ॥ तमोगुण मार्गे सारा ॥ सत्वगुण लावा अंगारा ॥ विंचू इंगळी उतरे झरझरा ॥ विंचू० ॥ ३ ॥ सत्यउताऱ्या येऊन ॥ अवघा सारिला तमोगुण ॥ किंचित् राहिली फुणफुण ॥ शांत केली जनार्दनें ॥ ४ ॥

## १३० येडका.

येडका मदन तो केवळ पंचानन ॥ येड० ॥ ध्रु० ॥ धडक मारिली नारदा ॥ केला रावणाचा चेंदा ॥ दुर्योधना मारिली गदा ॥ घेतला प्राण॥ तो केवळ० ॥ १ ॥ धडक मारिली शंकरा ॥ केला ब्रह्याचा मातेरा ॥ इंद्र चंद्रासी भेदरा ॥ लाविला जेणें ॥ तो के० ॥ २ ॥ भस्मासुर मुकला प्राणासी ॥ तेचि गति झाली वाळीसी ॥ विश्वामित्रा सारिखा ऋषी ॥ नाडिला जेणें ॥ तो केवळ पं० ॥ ३ ॥ शुकदेवांनीं ध्यान धरोनी ॥ येडका आणिला आकळोनी ॥ एका जनार्दनाचे चरणीं ॥ लाविला ध्यानें ॥ तो के० ॥ येडका ॥ ४ ॥

## १३१ भूत.

भूत जबर मोठें ग बाई॥झाली झडपण करूं गत काई ॥ भूत ॥ ध्रु० ॥ सुपचाटुचे केले देवऋषी ॥ या भुतानें धरिली केशी ॥ भूत० ॥ ॥१॥ लिंबू नारळ कोंबडा उतारा ॥ त्या भू-

तानें धरिला थारा ॥ भूत० ॥ २ ॥ भूत लागलें नारदाला ॥ साठ पोरें झालीं त्याला ॥ भूत०॥३॥ भूत लागलें ध्रुवबाळाला ॥ उभा अरण्यांत ठेला ॥ भूत० ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भूत ॥ सर्वांठायीं सदोदित ॥ भूत जबर० ॥ ५ ॥

## १३२ विटिदांडू.

हबक दुबक तिबक पोरा त्रिगुण खेळ मांडूं ॥ खेळूं विटी-दांडू ॥ ध्रु० ॥ सत्व विटी धरूनि हातीं धीर धरी दांडू ॥ भाव-बळें टोला मारी भिऊं नको गांडू ॥ १ ॥ ब्रीदगळ खेळ खेळूं लक्ष लावीं तीसी ॥ मूर्खापाशीं युक्ति नाहीं उडूनि गेली उसी ॥ ॥ २ ॥ ओकड लेंड मुंड नाल पुढें आणि लेंका ॥ भक्तिबळें खेळूं खेळ जनार्दनीं एका ॥ खेळवि० ॥ ३ ॥

## १३३ चेंडूफळी १ली.

झेलारे भाईनों झेलारे ॥ गुरुवचनें तुह्मीं झेलारे ॥ ध्रु० ॥ सहजचेंडू समानफळी ॥ खेळूं जाणे तो खेळिया बळी ॥ १ ॥ झेलारे० ॥ अभिमानाचा चढे तो खालता पडे ॥ हातचा चेंडू जाय मग चडफडे ॥ झे० ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकचि बोली ॥ गुरुपुत्र होय तोची झेली ॥ झेलारे० ॥ ३ ॥

## १३४ चेंडूफळी २ री.

झेलारे झेला वरचेवर झेला ॥ हातचें गमावितां पाठी खाई

टोला ॥ ध्रु० ॥ त्रिगुणाचा चेंडू हातीं झुगारी निराळा ॥ वहि-लिया मनमुख लावीं तेथें डोळा ॥ १ ॥ अगळा होउनियां धरी वरचेवरी ॥ चपळतेची जिंकी गड्या टाकी येरझारी ॥ २ ॥ हातीं सांपडल्यावरी बसुन देती कोणी ॥ स्वारी मागें स्वारी घेती वणवे करूनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुख पाहें तयाचें आग-ळें ॥ हरीशी जींकी तरी कोणे एके खेळें ॥ ४ ॥

## १३५ हुतुतु.

हुतुतुतुतु गड्या ॥ खेळ हुतुतुतुतु गड्या ॥ ध्रु० ॥ राम कृष्ण गोविंद हरीनारायण ॥ नित्य त्यांचें भजन करारे ॥ १ ॥ हिरण्यकश्यप प्रल्हादपुत्र ॥ खेळतां आला हातघाईरे ॥ स्तंभ फोडुनी बाहेर निघाला ॥ पित्या दिधली द्वाहीरे ॥ २ ॥ राम रावण सन्मुख भिडतां ॥ बरवा खेळ मांडिलारे ॥ कुंभकर्ण इंद्रजीत अखिया ॥ त्यांनीं दिधली घ्याईरे ॥ ३ ॥ कौरव पां-डव समरंगणीं ॥ खेळीया चक्रपाणीरे ॥ कामक्रोध जिवें मारा ॥ त्यांनीं दिधली घ्याईरे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हुतुतु खेळतां ॥ मग रंगणीं पाहींरे ॥ एकसे हुतुतु त्यांनीं बांधिले ॥ पूर्वे दिधलें घ्याईरे ॥ हुतुतु०

## १३६ भोंवरा.

खेळे भोंवराग बाई भोंवरा ॥ राधिकेचा नवरा ॥ ध्रु० ॥

माझ्या भोंवऱ्याची अरी ॥ सप्तपाताळ त्यावरी ॥ फिरेगरगरा राधिकेचा नवरा ॥ खेळे० ॥ १ ॥ भोंवरा बनला निर्गुणी ॥ त्यावर चंद्रसूर्य दोन्ही ॥ जाळी शंकरगवरा ॥ राधिकेचा नवरा ॥ खेळ० ॥ २ ॥ एकाजनार्दनीं खेळिया ॥ भोंवरा खेळुन पाहेचेल्या ॥ नांद देतो हरी हरा ॥ राधिकेचा नवरा ॥ खेळे भों० ॥ ३ ॥

## १६७ एकीबेकी.

एकी बेकी पोरा सांग झडकरी ॥ एकी ह्मणतां जिंकीसी बेकी ह्मणतां हारी ॥ ध्रु० ॥ नव्हे कांहीं बाई तेथें झालें एक शून्य ॥ त्यासी फांटा फुटतां मग लेखा आलें जाण ॥ येकी बेकी० ॥ १ ॥ एक दोन तीन पांच विस्तारीला जाण ॥ दहापासुनी सहस्त्रांवरी एक झाला पूर्ण ॥ येकी बेकी० ॥ २ ॥ एक ब्रह्म पूर्ण तेथें फाट झाली माया ॥ एकाजनार्दनीं नित्य लक्ष लावीं पायां ॥ ये० ॥ ३ ॥

## १३८ फुगडी पहिली.

खेळग फुगडी ॥ नको जाऊं तूं रडी ॥ ध्रु० ॥ फुगडी खेळगे तूं पिंगा ॥ आलिस माझ्या संगा ॥ फुगडी खेळरे श्रीरंगा ॥ सोडुन धांगडधिंगा ॥ खेळ० ॥ १ ॥ फुगडी खेळगे फेराची ॥ हो बाइल दीराची ॥ लज्जा सांडगे मनाची ॥ गांव-

च्या लोकांची ॥ खे० ॥ २ ॥ फुगडी खेळग लाखोटा ॥ धर माझा आंगोठा ॥ बळकट घालगे कांसोटा ॥ सोडुन चारीवाटा ॥ खेळ० ॥ ३ ॥ फुगडी खेळगे शिवशक्ती ॥ हरिनामाची भक्ती ॥ तुकया स्वानंदें गर्जती ॥ द्रौपदीच्या कीर्ति ॥ खेळ० ॥ ४ ॥

## १३९ फुगडी दुसरी.

फुगडी फू फूगडी घालितां उघडा राहे ॥ लाज सोडुनी एका एकीकडे पाहे ॥ १ ॥ फुगडीच अवघे मोडीरे ॥ तरीच गोडी संसार तोडीरे ॥ २ ॥ मागें जैसी केलिस होती पोटी ॥ ते उच्चारुनी आउच्चारी होटी ॥ ३ ॥ त्रिगुणाची वेणी तुझे उडते पाठी ॥ सांवरोनी धरीं घालीं मूळबंदीं गांठी ॥ ४ ॥ आगळें पाऊल जिंकी एका एक ॥ पावसी मान हे मानवती तीन्हीलोक ॥ ५ ॥ तुका ह्मणे तुजमध्यें एक भाव ॥ समतुकें भार घेऊं पावों उंच ठाव ॥ ६ ॥

## १४० फुगडी तिसरी.

फुगडी फू बाइ फुगडी फू ॥ ध्रु० ॥ फुगडी फू सवती माझे तूं, हगून भरलें धू, तुझे ढुंगणावरी थू ॥ १ ॥ फुगडी घेतां आले हरी, चल उठ जाऊं लवकरी, हातपाय बंबाळ जाती, ढुंगण घोळितां लागे माती ॥ २ ॥ सरला दम पांगले

पाप, अजून तरी घोळशी काय ॥ तुका ह्मणे अजून तरी ॥ हरिभजन नित्य करीं ॥

## १४१ फुगडी चवथी.

फुगडी फू बाई फुगडी फू ॥ ध्रु० ॥ एक नाम मांडे बाई ॥ द्वैत नाम सांडीं ॥ १ ॥ निजब्रह्मबाई परब्रह्म तूंगे ॥ २ ॥ हरी आला रंगाबाई ॥ वैष्णवांच्या संगा ॥ ३ ॥ चित्तमळ धूगे बाई विषयावरी थूगे ॥ ४ ॥ ज्ञानदेवा फुगडी बाई संसार उघडी ॥ ५ ॥

## १४२ पिंगा.

निराकाराचा आकार झाला ॥ त्यांतच माझा पिंगा जन्मला ॥ निराकारासी घेऊन आला ॥ माझा पिंगा घालितो धिंगा ॥ ध्रु० ॥ पिंग्यापासुन शंकर झाला ॥ ढवळ्या नंदीवर बसून आला ॥ माझ्या पिंग्यानें धका दिला ॥ माझा० ॥ १ ॥ पिंग्यापासुन मच्छ झाला ॥ शंखासुराचा प्राण घेतला ॥ चारी वेद घेउन आला ॥ माझा० ॥ २ ॥ पिंग्यापासुन कूर्म झाला ॥ पर्वत पाठीवर घेतला ॥ चौदा रत्नें घेउन आला ॥ माझा० ॥ ३ ॥ पिंग्यापासुन वराह झाला ॥ हिरण्याक्षाचा प्राण घेतला ॥ पृथ्वीवरती घेउन आला ॥ माझा० ॥ ४ ॥ पिंग्यापासुन नारसिंह झाला ॥ हिरण्यकश्यप दैत्य वधिला ॥

प्रल्हाद भक्त रक्षिला ॥ माझा० ॥ ५ ॥ पिंग्यापासुन वामन झाला ॥ बलीदान मागूं लागला ॥ बळी पाताळीं घातला ॥ मा० ॥ ६ ॥ पिंग्यापासुन भार्गव झाले ॥ मातेचें शिर छेदियेलें ॥ अवघे राजे नाहींसे केले ॥ मा० ॥ ७ ॥ पिंग्यापासुन राम झाले ॥ पितृवचन संभाळिलें ॥ रावणकुंभकर्ण मारिले ॥ मा० ॥ ८ ॥ पिंग्यापासुन कृष्ण झाला ॥ कंसाचा प्राण घेतला ॥ गोकुळ सोडुन मथुरेसीं आला ॥ मा० ॥ ९ ॥ पिंग्यापासुन बौद्ध झाला ॥ दिलें जगन्नाथ नांव त्याला ॥ भक्तांनीं दहीं भात चारिला ॥ मा० ॥ १० ॥ ऐसा निराकाराचा पिंगा ॥ त्यांत माझा श्रीरंगा ॥ एकाजनार्दनीं पांडुरंगा ॥ माझा पिंगा घालितो धिंगा ॥ मा० ॥ ११ ॥

## १४३ हमामा.

हमामा पोरा हमामा ॥ घुमरी वाजे घमामा ॥ ध्रु० ॥ हमाम्याचे नादांनीं ॥ घुंबरी वाजली रानीं ॥ १ ॥ हमाम्याची शीतळ शाई ॥ पोरा मेली तुझी आई ॥ २ ॥ कामक्रोध पोरा नाशी ॥ अहंकारबोंचा वाशी ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवराशी ॥ पोरा वहिल्या गांवा जाशी ॥ ४ ॥

## १४४ वेणू.

याचे हातींचा वेणु कोणि घ्यागे ॥ या० ॥ गृहीं आपुले

मी करित होतें धंदा ॥ वेणु वाजविला नंदाचिया नंदा ॥ तल्लिन झालें या मुरलीचिया नादानादा ॥ याचे० ॥ १ ॥ याचा नवलाव सांगू मी काई ॥ चित्तवृत्ति वेधली यायें बाई ॥ संसृति ठावठाव उरला नाहीं नाहीं ॥ याचे० ॥ २ ॥ गृहीं सासुरवास मलाभारी ॥ जावा नणदा गांजिती परोपरी ॥ याचे मुरलीनें ठकविल्या पोरी पोरी ॥ याचे० ॥ ३ ॥ तान्हें बाळक टाकूनि आल्यें घरा ॥ गृहीं सासू सासरा म्हातारा ॥ त्यानें केला या जिवाचा कीं वारा वारा ॥ याचे० ॥ ४ ॥ वेणु नोहे हें विष मला वाटे ॥ नाद ऐकुनी काम हृदयीं दाटे ॥ मच्छनाथाची मूर्ति हृदयीं भेटे भेटे ॥ याचे० ॥ ५ ॥

## १४५ पुंगी.

अनुहात वाजवी पुंगी ॥ बावा जोगी ॥ अनु० ॥ ध्रु० ॥ अनंत युगांचा अतीत ॥ दोनी दोरे पवन सुत ॥ झोळी शिवली सप्तधातूंत ॥ चऊंखाणीची केली विभूत ॥ लाविली अंगीं ॥ अनु० ॥ १ ॥ चौशून्याच्या घातल्या वाटा ॥ गगनकैलासीं गोंविल्या जटा ॥ त्याणें मेरूचा केला सोटा ॥ सप्तसागरींचा केला घोटा ॥ मीनमार्गी ॥ अनु० ॥ २ ॥ चवदा चक्रांचीं बांधिली मढीं ॥ हातीं घेउन ज्ञानतुंबडी ॥ चंद्र सूर्य दीप जोडी ॥ लावली सिंगी ॥ अनु० ॥ ३ ॥ ऐसा तो संन्यासी

निर्गुण ॥ निरालंब निरंजन ॥ करितो त्रिवेणीचें स्नान ॥ दिसतो भ्रमर गुंफेंतून ॥ ऐसा तो योगी ॥ अनु० ॥ ४ ॥ ऐसा तो गोसांवी भेटला ॥ पेला ब्रह्मींचा पाजिला ॥ रामदास तयाचा चेला ॥ युगानयुगीं ॥ अनु० ॥ ५ ॥

## १४६ डुगडुग्या.

डुगडुग डुगडुग डुग ॥ डुगडुगोनि गेले चारयुग ॥ काम क्रोधाचेनि लागवेग ॥ या मनामार्गे धांवत ॥ डुग० ॥ १ ॥ हीत नोहेगा सर्वथा ॥ गेलें हरपोनी पाहतां ॥ भुलले मायेनें सर्वथा ॥ यमपंथासी जाती ॥ डुग० ॥ २ ॥ जातां यमपुरींच्या वाटे ॥ जिवासी आघात आहेत मोठे ॥ संचित क्रिया नामाचे सांठे ॥ तया वाटेसीं जाऊं पाहे ॥ डुग० ॥ ३ ॥ जे भले सात्विक संत ॥ आहेत निशिदिनी गुरुचे भक्त ॥ त्यासि माझा नमस्कार येत ॥ गुरूसी शरण जा वेगीं ॥ डुग० ॥ ॥ ४ ॥ गुरूसी गेलिया शरण ॥ काय करील जन्म मरण॥ स्वरूपीं लागेल अनुसंधान ॥ निजनिधान प्रगट होय ॥ डुग० ॥ ५ ॥ आणिक एक सांगतों शकुन मोठा ॥ तुज लागला एक्या बायकोचा चपेटा ॥ तिच्या चांगुलपणाला सुभटा ॥ भुलूं नको सर्वथा ॥ डुग० ॥ ६ ॥ आणिक एक तिची करणी ॥ विष्णूस लाविलें वृंदेच्या स्मशानीं ॥ नारदाची नारदी करूनी ॥ साठ पुत्र जन्मविले ॥ डुग० ॥ ७ ॥ यालागीं तिचा पदरू

नाहीं बरा ॥ अंतीं दगा देइल सारा ॥ अजून तरी हित विचारा ॥ दान करा पीडा टळे ॥ डुग० ॥ ८ तिनें बहुतांसी दगा दिधला ॥ ईश्वरासारिखा भुलविला ॥ ब्रम्हयासी वेध लाविला ॥ रत झाला कन्येसी ॥ डुग० ॥ ९ ॥ नवाठायीं फाटला झगा ॥ तो नये तुझे उपयोगा ॥ विषय भोगीत आंगा ॥ तो मजदान पिंगळीया ॥ डुग० ॥ १० ॥ काळामीच काळीं चिरगुटें ॥ पदरीं बांधून मी तूं पणाचें मीठ ॥ त्रिवर्ग करोनी रोकडे नीट ॥ ओंवाळून टाकीं आतां ॥ डुग० ॥ ११ ॥ तेणें टळेल तुझी पीडा ॥ चुकेल मी तूं पणाचा झगडा ॥ स्वरूपीं होईल आनंद गाढा ॥ श्रीजनार्दन प्रसादें ॥ डुग० ॥ १२ ॥ एका जनार्दनीं प्रेम बोध ॥ प्रगट होय साबाद ॥ पिंगळा भाकीतसे प्रबोध ॥ परोपकार जाणेगा राया ॥ डुगडुग ॥ १३ ॥

## १४७ चौरंग.

अरे हरी प्यालों मी प्याला ॥ प्याला नामाचा ॥ छंद लागला विठोबाचा ॥ करून चौरंग ॥ चौरंग देहाचा ॥ आंतखुब जडाव रत्नांचा ॥ चारी माचवे ॥ माचवे चौकी चौकोनी ॥ केव्हांची विठ्ठल रखुमीणी ॥ झालें मी मगन, मगन हरिभजनीं ॥ केव्हांची० ॥ १ ॥ तीनशें साठ, साठ तुकड्यांचा ॥ चौरंग अमोल मोलाचा ॥ दोर गुंफीला, गुंफीलाराव सत्वाचा ॥ आकार

तीन्ही लोकांचा ॥ चारीकमळें, कमळें विश्वमोहनी ॥ केव्हांची० ॥ झालें मी मगन० ॥ २ ॥ लावुन दरवाजा. दरवाजा वारागीर ॥ बत्तीस शिपाई चौकिदार ॥ आणिक नव खिडक्या, खिडक्या चौफेर ॥ मेरुशिखरीं दशमद्वार ॥ तेंहीगुप्त, गुप्त दावोनी ॥ केव्हां० ॥ ३ ॥ गिलावा रोगण, रोगणहो करुनी ॥ आंत तें सत्रावीचें पाणी ॥ रूप सुंदर. सुंदर नाना योनी ॥ तेज फांकलें त्रिभुवनीं ॥ वरशिवशक्ती, शक्तीस्थापोनी ॥ केव्हां० ॥ ॥ ४ ॥ ऐसा चौरंग, चौरंग बनावीला ॥ कोंदणीं हिरा बेसवीला ॥ शिवलिंग लोळे, लोळे गुरुचरणीं ॥ केव्हांची विठ्ठल रखुमीणी ॥ झाल्यें० ॥ ५ ॥

## १४८ रहाट.

हुंडागी निघाली संसारा ॥ बारीक माझा जुना ॥ ध्रु० ॥ दारावीं गोधनकां तोडाना ॥ मजला रहाट करुनकां घाना ॥ माझे रहाटाकडे कां पहाना ॥१॥ तुमचा बैल कां माराना ॥ मजला तात करून कां घाना ॥ माझे ताताकडे कां पहाना ॥ ॥२॥ तुमची तलवार कांमोडाना ॥ मजला चात करुन कां घाना ॥ माझ्या चाताकडे कां पहाना ॥ ३ ॥ तुमची टाळ कां मोडाना ॥ मजला भिंगरी करूनकां घाना ॥ माझ्या भिंगरीकडे कां पहाना ॥ ४ ॥ तुमचीं वस्त्रें कां फेडाना ॥ मजला पिं-

जुन पिंजुन कां द्यावा ॥ माझ्या पिंजण्याकडे कां पहाना ॥ ५ ॥ पिंजुन पिंजुन केला पिळू ॥ नव इंद्रियां खेळूं ॥ येकाजनार्दनापीळूं ॥ ६ ॥

## १४९ मोगरा.

कैवल्यस्वरूप लावियेलें द्वारीं ॥ त्याचा वेल गेला गगनावरी ॥ १ ॥ मोगरा फुलला फुलला ॥ फुलें वेंचीतां बारू कळीयासी आला ॥ मोग० ॥ ध्रु० ॥ २ ॥ मनाचिये मणी गुंफियेला झरा ॥ बापरखुमादेवीवरू विठ्ठला अर्पीला ॥ मो० ॥३॥

## १५० फुलवरा.

पिंड अंड ब्रह्मांड अंतरीं दैवत भिन्नाकृतीहो ॥ शोधुनी पाहतां अवघें चराचर व्यापक घरसंपती हो ॥ भेदभाव त्रिगुणांचा रजतम सत्वाची आरती हो ॥ चाल ॥ ऐसें जाणुन केली उभवणी ॥ द्वैत सांडोनी ॥ तोड ॥ परी तो हरी मनीं आकळिला ॥ तुज म्यां फुलवरा बांधिला ॥१॥ जयजगदंबे पूर्ण कदंबे जगविध बोधे देह तुज अर्पिला ॥ तुजम्यां फुलवरा बांधिला ॥ ध्रु० ॥ आई भवानी थोर जाणुनी तुज म्यां उपासिलें हो ॥ खुळापांगुळा करुनि आपणा जवळी बैसविलें हो ॥ हातीं परडी देऊन तीनें मज भिकेसि लाविलें हो ॥ चाल ॥ उदोअस्ता भरे गरगरां फिरे ॥ भूते वावरे ॥ तोड ॥ मज-

व्यर्थ शीण वाटला ॥ तुज० ॥ २ ॥ खंडोबासी नवस करूनी मुरळी होउनी बैसली हो ॥ वारी मागतां पोट भरेना बहु श्रम पावली हो ॥ आपुले जे कां सखे सज्जन वांचून भरीं भरली हो ॥ चाल ॥ श्वानाचियेपरी व्यर्थगुरगुरी ॥ जाय चावरी ॥ तोड ॥ सुखाचा लेश नाहीं लाधला ॥ तुज म्यां फुल० ॥ ॥ ३ ॥ माझे घरीं पाहुणा भैरव येऊन बैसला हो ॥ त्रिगुणाचा त्रिशूळ घेऊनि प्रपंच विस्तारिला हो ॥ जोग्या बोलाउन पत्र पूजन भरड म्यां घातिला हो ॥ चाल ॥ ऐसी वरदावळ सोसिली ॥ बळें झाली निर्फळ ॥ तोड ॥ सुखाचा लेश नाहीं लाधला ॥ तु० ॥ ४ ॥ मुंज्याबाची डाक भरोनी मेसाई आळविली हो ॥ त्रिगुणाची तिवय करूनी त्यावर बैसविली हो ॥ धूप दीप नैवेद्य अर्पुनी पंचारती केली हो ॥ चा० ॥ तिनें जोडिलें बहु जाचिलें ॥ तो० ॥ मग म्यां लोटुनि दील्हे तिला ॥ तु० ॥ ५ ॥ ऐसें दैवत अनंत केलें नवस बहू फेडले हो ॥ परी तें फळ कष्टी झालें शेवटीं गळां येऊन पडलें हो ॥ चा० ॥ झालें विटेवरी उदास ॥ धरिली कास ॥ तो० ॥ पंढरी पाहून जिव माझा हर्षला ॥ तु० ॥ ६ ॥ वैकुंठाहून निधान त्याचे असती जे प्रियकर हो ॥ त्याची गांठ पडली त्याणें मग दिधला अभय कर हो ॥ चा० ॥ परात्पर सोयरा ॥ कुंडलीकबरवा ॥ दिधला थारा ॥ तोड ॥ तेणें मज बुडतां हात दीध-

ला ॥ तु०॥७॥ डोळां घालुनी अंजन देउनी मग मी गेलें राउळीं हो ॥ विटेवरी जगदंबा एका एकीं नयनीं देखिली हो ॥ मनोभावें मनोवृत्ती देहाची खुंटली हो ॥ चा० ॥ एकाजनार्दनीं भली ॥ द्वैतहरपली ॥ एक संचली ॥ तो० ॥ जन्ममरणपट फाटला ॥ तु० ॥ ८ ॥

## १५१ दळण.

सुंदर माझें जातेंग फिरें बहुत ॥ ओंव्या गाऊं कौतुकें तूं येरेबा ॥ १ ॥ जीव शिव दोनी खुंटेहो प्रपंचावे नेटे हा ॥ लावुनि पांचीं बोटें तूं येरेबा ॥ २ ॥ सासू सासरा दीर तिसरा ॥ ओंव्या गाऊं भ्रातारा तूं येरेबा ॥ ३ ॥ बारा सोळा गडणी अवघ्या कामिनी ॥ ओंव्या गाऊं बसुनी तूं येरेबा ॥ ४ ॥ प्रपंच दळण दळिलें पीठ रिलें ॥ सासुपुढें ठेविलें तूं येरेबा॥५॥ वत्साचे आधण ठेविलें पुण्य वैरिलें ॥ पापतें वोनुन गेलें तूंये रेबा ॥ ६ ॥ जनीनें जातें गाइलें ॥ कीर्ति राहिली ॥ थोडासा लाभ होइल तूं येरेबा ॥ ७ ॥

## १५२ घस्त

विठोबा चला, चला मंदिरांत ॥ गस्त हिंडती बाजारांत ॥ विठो० ॥ ध्रु० ॥ रांगोळी घातली, घातली गुलाल्याची ॥ शेज म्यां केली पुष्पांची ॥ समया जळती, जळती अर्ध रात्रीं ॥

घस्त हिंडती हाकीमाची ॥ गळ्यामाधिं माळा, माळा मोत्याची ॥ घस्त हिंडती हाकीमाची ॥ २ ॥ नामदेवाला, सांपडलें माणीक ॥ घेतलें जनीनें हातांत ॥ घेऊन गेली, गेली राउळांत ॥ घस्त हिंडती बाजारांत ॥ ३ ॥

## १५३ चौघडा.

पंधरा सतरांचा हो मेळा ॥ कारखाना झाला गोळा ॥ वाजविती आपुल्या कळा ॥ प्रेमबळा आनंदें ॥ १ ॥ झडतो नामाचा चौघडा ॥ झ० ॥ ध्रु० ॥ झडतो नामाचा चौघडा ॥ ब्रह्मीं ब्रम्हरूपींचा हुडा ॥ संत ऐकताती कोडा ॥ प्रेमबळा आनंदें ॥ झ० ॥ २ ॥ जनाबाई घड्याळ मोगरी ॥ घटका भरतां टोला मारी ॥ काळ व्यर्थची गेला तरी ॥ गजर करी आनंदें ॥ ३ ॥ नामा दामा दोनी काळू ॥ नाराविठादमामे फैळू ॥ चौघी सुना चारी हेलू ॥ कडकडा बोल उमटती ॥ झ० ॥४॥ गोंदाम्हादा करणी करी ॥ नादें दुमदुमली पंढरी ॥ आबुबाई तूं तारीं ॥ मंजुळ स्वर उमटती ॥ झ० ॥ ५ ॥ गोनाबाई नोबतपल्ला ॥ नाद अंबरीं कोंदला ॥ राजाई झांज मंजुळ बोला ॥ मंजुळस्वर उमटती ॥ झ० ॥ ६ ॥ तेथें चौका बारीदार ॥ काटवन विंजन जाळिजे सार ॥ अवघे झाडवणी माहार ॥ उतरले पार संतांसंगें ॥ झ० ॥ ७ ॥

## १५४ घोंगडी पहिली.

येरे घोंगडीच्या पांघरणारा ॥ गाई वळणारा मनीं वसणारा ॥ पीत वसन बळकट कटीं कसणारा ॥ ध्रु० ॥ पाशुपत तनुसह कदंब सांवळीहरी हरी ॥ मधुर मधुर मुरली वाजविणारा ॥ येरे० ॥ १ ॥ धरूनि राधिका पदरीं निजकरीं हरी हरी ॥ विशदंती मधुरमधुर हसणाऱ्या ॥ येरे० ॥ २ ॥ भक्तां भाविकां अमृतमयकरी हरी हरी ॥ भक्तजन निजहित गुज पुसणारा ॥ येरे घोंगडीच्या पांघरणारा ॥ ३ ॥

## १५५ घोंगडी दुसरी.

खेळत होतों सुरकवडी ॥ माझी घोंगडी हरपली ॥ १ ॥ मा० ॥ ध्रु० ॥ कान्होबाच्या पडलों गळां ॥ येई गोपाळा देईं झाडा ॥ २ ॥ येईगो० ॥ माझी० ॥ घों० ॥ ध्रु० ॥ मी तो हर्षे उघडा झालों ॥ अवघा लोभ आहेरे ॥ मा० ॥ ३ ॥ तुका ह्मणे बुद्धिमांचे ॥ ठायींचे ठायीं मजपासीं ॥ ४ ॥

## १५६ घोंगडा.

वांकडा ह्मणे कृष्णाच्या बापा मी एक देखिलें भूतरे ॥ त्याचें बीज पहिलें जळोनि गेलें शेषित राहिलें किंचितरे ॥ देहेवीग छळतो तेथेंच पिडतो त्याठाय असे मल मूत्ररे ॥ तेणें

जिंकिलें कोण कोणते त्यासीं जिंकणार कोणतारे ॥ १ ॥ धोंगडें माझें बोलणें कान्होबा धों० ॥ ध्रु० ॥ जुनाट जोगडा काळाचा कांकडा डोंगरीं राहतो भोळारे ॥ झडपी लहावे नागवाचि धावे पाठी लागला भिल्ल भोंडारे ॥ कर्दळि खोंपा उघडुनि झोपा पाहुन भुललें तोंडारे ॥ जग अंधारी महाभेसुरी अपादयाचा चालला लोंढारे ॥ धों० ॥ २ ॥ कल्लोळ हाडाचा बाप चाडांचा अखंड घडतो मडकीरे ॥ त्यासी एक बहु संचार झाला हिमालयाचे खडकीरे ॥ बहु वेऱ्याची नवरी पाहुन जिवांत भरली धडकीरे ॥ कुणि एकवेळीं पाठीं लागली भेडसाविलें कडकीरे ॥ धों० ॥ ३ ॥ नंगाचि खांदी नंगाचि दंडी अति हाडाचा ठेंगारे ॥ त्यासीं एक बहु संचार झाला येउनि जडला आंगारे ॥ सुता आंदाचा पग नंगीचा चीरी फेडतो कांगारे ॥ त्यासी एक पुट वृक्ष भेटला डांगांनीं मोडल्या टांगारे ॥ धों० ॥ ४ ॥ गंगा मांदारी सांगळी वरी रमला तपोवर्गारे ॥ त्यासी एक पुत्र जळीं जन्मला त्याणें केलीं जठरा परवेंरे ॥ तोचि साक्षी वेदोनारायण त्याचें बोलणें बरवेंरे ॥ कुरंगिणीचे पाडस धुविलें भिरविलें अयोध्यापुरींरे ॥ धों० ॥ ५ ॥ डोळियाचे जवळी द्विज जन्मला तेंचि त्याचें वाहनरे ॥ बापा परासी येक तोंडांनीं आगळा तारकाई केली हननरे ॥ शैल्या आत्मज सौतीचा तनया तुझ्या हातीं त्याचें

मरणरे ॥ दिवानदारी जो कां रमला नातवंड त्यावें गहनरे ॥ धों० ॥ ६ ॥ लंगोटबंधन हुंगा तसे पुढें अंजनी जितकाळ तोंडारे ॥ रातींतुन जेणें शेंपटींसी बांधुन संकटीं आणिला धोंडारे ॥ त्रिभुवनवासी तो देवऋषी बाप ज्याचा चौ तोंडीरें ॥ सोळासहस्त्र नारी भोगुन ब्रह्मचारी ह्मणविसी लंडारे ॥धों०॥ ७॥ वाकडायानें आणा घातला जाणा उकलिल विरळागतुरे ॥ अठा पदांची अष्टपदीं गाईली तो एकासी अद्भुतरे ॥ पदापदाचा अर्थ करीतो तो येक असे बहुश्रुतरे ॥ एकाजनार्दनीं विनवीतसे भूत नव्हे कान्होबाचें सूतरे ॥ धोंगडे० ॥ ८ ॥

## १५७ जोगवा.

अनादि निर्गुण प्रगटली भवानी ॥ मोह महिषासुर मर्दना लागोनी ॥ त्रिविध तापाची करावया झाडणी ॥ भक्तां लागोनी पावसी निर्वाणीं ॥ १ ॥ आईचा जोगवा जोगवा मागेन ॥ द्वैत सारोनी माळ मी घालीन ॥ हातीं बोधाचा झेंडा मी धरीन ॥ देहरहित वारीसी जाईन ॥ आईचा जोगवा जो० ॥ ॥ २ ॥ नवविध भक्तीच्या करोनी नवरात्रा ॥ करो निराकारण मागेन ज्ञानपुत्रा ॥ दंभ सासरा सांडीन कुपुत्रा ॥ करीन सद्भावें अंतरींच्या मुद्रा ॥ आईचा जो० ॥ ३ ॥ पूर्ण बोधाची भरीन मी परडी ॥ आशा मनशांच्या पाडीन दरडी ॥ मनवि-

कार करीन कुरवंडी ॥ अमृतरसाची भरीन दुरडी ॥ आईचा जो० ॥ ४ ॥ आतां साजणी झालें मी निःसंग ॥ विकल्प नवऱ्याचा सोडियेला संग ॥ कामक्रोध हे झोडियेले मांग ॥ केला मोकळा मार्ग सुरंग ॥ आईचा जो० ॥ ५ ॥ ऐसा जोगवा मागोन ठेविला ॥ जाऊनि महाद्वारीं नवस म्यां फेडिला ॥ एका जनार्दनीं देखिला देखिला ॥ जन्म मरणाचा फेरा चुकविला ॥ आईचा जो० ॥ ६ ॥

## १५८ गुरगुडी.

गुरगुडी घेतली आह्मी ॥ नित्य बैसोनी मंगळधामीं ॥ गु० ॥ ध्रु० ॥ स्वात्मसुखाच्या नारळासी ॥ धीरमेरु जोडिला त्यासी ॥ गुर० ॥ १ ॥ भक्ति प्रेमाचें जीवन भरी ॥ आंत वैराग्य बडबड करी ॥ गुर० ॥ २ ॥ अकर्माची चिलीम भरी ॥ ज्ञान अग्नी ठेविलावरी ॥ गुर० ॥ ३ ॥ स्वानुभवाची नळी जोडी ॥ कल्पनेचा धूर सोडी ॥ गुर० ॥ ४ ॥ द्वैत जाळुनी केली राख ॥ केशवें गुरगुडी घेतली देख ॥ गुरगुरडी ॥ ५ ॥

## १५९ पेंठ.

पुंडलिकें रचिली पेंठ भूवैकुंठ ॥ पुंड० ॥ ध्रु० ॥ वैकुंठाहुनी श्रीहरी ॥ आले चंद्रभागेतीरीं ॥ कर ठेवुन कटावरी ॥ समपदीं नीट ॥ पुंडलिकें र० ॥ १ ॥ दिव्यरूप मनोहर ॥

कांसे शोभे पीतांबर ॥ गळां वैजयंती हार ॥ माथां मुगूट ॥ पुंड० ॥ २ ॥ कौल दिला पुंडलिकानें ॥ यारे यारे अवघे जण ॥ नाम सौदा भरा केणें ॥ करावी लूट ॥ पुंडलिकें० ॥३॥ दिंडी पताकांचे भार ॥ वैष्णव मिळाळे अपार ॥ करिती नामाचा गजर ॥ कलकलाट ॥ पुंड० ॥ ४ ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें ॥ देव उभाउभीं भेटे ॥ खळां तळमळ पाझर सुटे ॥ सद्गदित कंठ ॥ पुंड० ॥ ५ ॥ सर्व गोकुळींची रचना ॥ संगें घेउनी यादव राणा ॥ गोपाळपुर वसविलें जाणा ॥ सुंदरबेट ॥ पुंड० ॥ ६ ॥ आषाढी कार्तिकी महापरवणी ॥ सुरवर येताती धावुनी ॥ अठ्यायशीं सहस्र ऋषी मुनी ॥ मिळाला थाट ॥ पुंड० ॥ ७ ॥ ब्रह्म नाहीं पंढरीं ॥ कर्म ब्रह्म काशीपुरीं ॥ ओऱ्या जगन्नाथ नगरीं ॥ अन्न ब्रह्म स्पष्ट ॥ पुंडलिकं० ॥ ॥ ८ ॥ उत्तम नरदेहा येउनी ॥ पांडुरंग पहावा नयनीं ॥ ऐसें दैवत त्रिभुवनीं ॥ नाहीं कोठें ॥ पुंडलीकें र० ॥ ९ ॥ विनवी कृष्णदास सकळांसी ॥ धरा निश्चय मानसीं ॥ ठाव देइल चरणापासीं ॥ सन्निध निकट ॥ पुंडलीकें रचिली पेंठ ॥ भूवैकुंठ ॥ पुंडलिकें रचिली पेंठ ॥ १० ॥

## १६० शिमगा १ ला.

सत्वगांठीं उमगा ॥ तेणें सफल होइल शिमगा ॥ तुह्मीं

हेंच गाणें गा ॥१॥ तुह्मी हांसूं नका ॥ तुह्मी हांसूं नका ॥ ध्रु० ॥ भूतसभेचीं कारटीं ॥ विषया गौऱ्या चोरटी ॥ उतरा कुकर्मांचीं राहटी ॥ तुह्मी हांसूं नका ॥ हांसूं नका ॥ २ ॥ जागोजागीं थांबा ॥ अवघ्या मिळोनि मारा बोंबा ॥ नजळे एरंडाच्या कोंबा ॥ तुह्मी हांसूं नका ॥ हांसूं नका ॥ तु० ॥ ३ ॥ गांवचा पाटील कोळी ॥ काळोबाची पिककी पोळी ॥ तुमची पाजळूं द्या होळी ॥ तुह्मी हांसूं नका० ॥ ४ ॥ ओंटींत घेऊनि गुलाल ॥ सख्या मेहुणीसंगें भुलाल ॥ तिचा नवरा मोठा जलाल ॥ तुह्मी हांसूं नका ॥ तुह्मी हांसूं नका ॥ ५ ॥ एका जनार्दनी पोस्त ॥ गाणें गातां हालमस्त ॥ नाहींतर भडवे समस्त ॥ तुह्मी हांसूं नका ॥ तु० ॥ ६ ॥

## १६१ शिमगा दुसरा.

साजणी शिमगा मी गातें गे ॥ मन माझें मी डोळां पाहतें गे ॥ ध्रु० ॥ सहाजण मारून, साजण धरितें ॥ साजणासंगें शिमगा मी करितें ॥ पांचांसंगे चवथीला नेतें गे ॥ मन० ॥ ॥ १ ॥ गगनांत डोहो भरपूर भरला ॥ स्वरूपाच्या लाटेंत साजण धरला ॥ चिन्मय राहटींत मनोरथ पुरला ॥ पाहून दंग मी होतें गे ॥ मन० ॥ दोहीं हातीं पिचकाऱ्या धरिल्या गे बाई ॥ नवरंगीं भरल्या त्या शोधित जाई ॥ शुभ्र

अभ्रामध्यें झळलतें काई ॥ रंगांत रंगून जातें गे ॥ मनमा० ॥
॥ ३ ॥ शिमगा तुझी उमगा जा जाहो कोणी ॥ जाइल शि-
मगा मग होइल हाणी ॥ मारून बोंब सांगतें कानीं ॥ नरह-
रिला महिपती ध्यातो गे ॥ मनमा० ॥ ४ ॥

## १६२ दसरा १ ला.

पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा ॥ सांपडेल तो साधा
आजी मुहुर्त बरा ॥ गर्जा जयजयकार हरी हृदयीं धरा ॥
आळस नका करूं सांगतों ल्हान थोरां ॥ १ ॥ याहो याहो
बाईयांनो निघाले हरी ॥ सीलंगणा वेगीं घेऊनि आर्त्या करीं ॥
ओंवाळूं श्रीमुख वंदों पाउलें शिरीं ॥ आत्मादेव आले घरच्या
घरीं ॥ ध्रु० ॥ अक्षई मुहूर्त आठवा मनीं साधे तेथें ॥ मग
येरी गर्जे तैसे होतें जातें ॥ म्हणुनी मागें पुढें कोणी न पहावें
येथें ॥ सांडावें तें काम जाऊं हरी सांगातें ॥ बहुतां बहुतां
रीती चित्तीं धराहो मनीं ॥ नका गहिंवरूं ऐका लज्जा कानीं ॥
ऐसीया संशयीं त्याच्या अभाग्यासी पार ॥ नाहीं नाहीं सत्य
जाण निरधार ॥ मग वेळ घटका नये अजरामर ॥ कळलें
असूंद्या मग पडतील विचार ॥ जयासाठीं ब्रह्मादिक पिसे ॥
उच्छिष्टा कारणें देव जळीं झाले मासे ॥ अर्धांगीं विश्व माता
लक्ष्मी वसे ॥ तो म्यां तुकया बंधू ह्मणे अनायासें ॥ १ ॥

## १६३ दसरा दुसरा.

साजणी मंगळ दसरा ॥ आह्मांस झाला बाई ॥ ध्रु० ॥ करून घटाची स्थापना ॥ चिद्रूपदीप लाउनी जाणा ॥ सोहं-माळ लावुन घना ॥ निजबीज पेरिलें ठायीं ॥ सा० ॥ १ ॥ नवविध भक्तीचे नवदिवस ॥ दहावा अद्वैत निजकळस ॥ अ-नुहात माळ लावुन त्यास ॥ वाद्यवाजे घन घाई ॥ साज० ॥ ॥ २ ॥ आत्माकांचन घेऊनि सुरा ॥ मनमेंढा मारून पुरा ॥ गेलें मूळच्या निजघरा ॥ लीन झालें गुरुपायीं ॥ साजणी०॥३॥ अंबर फोडून चिदंबर झालें ॥ अंबर स्वारी करूनि आलें ॥ निजरूप होऊन ठेलें ॥ ओंवाळिलें बाई ॥ सा० ॥ ४ ॥ नाना शास्त्र हें पुराण ॥ याचा अर्थ करितां जाण ॥ गोपाळनाथ लीन होऊन ॥ शरण गेला गुरुपायीं ॥ साजणी० ॥ ५ ॥

## १६४ यात्रा.

वाराणसी यात्रे जाईन ॥ प्रयाग तीर्थ पाहीन ॥ त्रीवेणीचें स्नान करीन ॥ परि मी वीट नव्हेन ॥ विठाबाईची वीट मी कें होईन ॥ ध्रु० ॥ गोदावरी यात्रे जाईन ॥ वाराणसीचें फल लाहीन ॥ आंब्रजक तीर्थी स्नान करीन ॥ परि मी वीट नव्हेन ॥ ॥ १ ॥ मल्लिकार्जुन यात्रे जाईन ॥ शैलेश्वर पाहीन ॥ पाता-ळ गंगे स्नान करीन ॥ परिमी वीट नव्हेन ॥ २ ॥ एका अं-

गुष्टीं तप करीन ॥ पृथ्वी पात्रची लाहीन ॥ देहकरवतीं देईन॥ परि मी वीट नव्हेन ॥ ३॥ बहुतां पुण्या सायासी॥ चरणजोडिले विटेसी ॥ निवृत्तिदास ह्मणे परियेसीं ॥ परी मी वीट नव्हेन॥४॥

## १६५ वैद्यगोळी.

अल्लादेवे अल्ला दिलावे ॥ अल्ला दारू अल्ला खिलावे ॥ अल्लावगर नहीं कोय ॥ अल्ला करे सो होय ॥ १ ॥ मरदहोय औ खड फीर ॥ नामारदकू नहीं धीर ॥ आपणें दिलकूं करणा खुशी ॥ तीनदामकी क्या खुमाशी ॥ २ ॥ कब रसोका किया मार ॥ भजन गोळी एकसार ॥ इनाम तोडा सबही जसा ॥ थोडी तोबी लेकरजा ॥ ३ ॥ जीनोपास नित्य सोवे ॥ वोई बसकर तीरावे ॥ सातो पांचो मरद लावे ॥ उतार तो पीछे खावे ॥ ४ ॥ समाल ज्यांनीं निकल जावे ॥ पीछे गधडा मट्टी खावे ॥ गावढाल सो क्या लेवे ॥ हागवनी भरी नहीं धोवे ॥ ५ ॥ मेरी दारू जानें खाया ॥ दिदारदींगी सोही पाया ॥ तले मुडी घाल जावे ॥ बेगारी सो क्या लेवे ॥ ६ ॥ बजार बजे भाव ॥ नाहीं पुछता आवे ठाव ॥ फुकट थाट कहे तुका ॥ लेवे सोही लेवे सखा ॥ ७ ॥

## १६६ वासना.

वासना ओढाळ गाई ॥ गड्यांनों वा० ॥ धु० ॥ जितकें

जाऊं नये तितकें जाय ॥ जेंजें खाऊं नये तेंतें खाय ॥ तिवा ह्मणून मोडावा पाय ॥ गड्यांनों० ॥ १ ॥ तिनें मोहिले महासुरजन ॥ ब्रह्मादिकां लाविलें ध्यान ॥ तिणें मारिल्यासे बाण ॥ ॥ २ ॥ ज्ञानदेवें चुचकारिली ॥ सोपानदेवें पायपीठ केली मुक्ताबाईनें धारकाढिली ॥ वासना ओढाळ गाई ॥ गड्यांनों वासना० ॥ ३ ॥

## १६७. थट्टा.

असीही थट्टा ॥ भलभल्यासि लाविला बट्टा ॥ ध्रु० ॥ थट्टा गेली शंभोपासी ॥ कलंक लाविला चंद्रासी ॥ भगें पाडिलीं इंद्रासी ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भलभल्यासि लाविला बट्टा ॥ १ ॥ थट्टेनें मेला दुर्योधन ॥ भस्मासुर गेला भस्म होऊन ॥ वाळिहि मुकला आपुल्या प्राणा ॥ असीही थट्टा ॥ भ० ॥ २ ॥ थट्टा रावणानें केली ॥ नगरी सोन्याची बुडविली ॥ थट्टा ज्याची त्यास भोंवली ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भ० ॥ ३ ॥ अरण्यांत होता भृगु ऋषी ॥ थट्टा गेली त्याचे पाशीं ॥ भुलवुनी आणिला अयोध्येसीं ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भ० ॥ ४ ॥ विराटराजाचा मेहुणा ॥ नाम तयाचें कीचक जाणा ॥ त्याणें घेतले बहुतांचे प्राणा ॥ बरीन० ॥ ५ ॥ थट्टेपासुन सुटले चवघेजण ॥ शुक भीष्म आणि हनुमान ॥ चौथा कार्तिकस्वामी जाण ॥

त्यांला नाहीं बट्टा ॥ अशीही थ० ॥ ६ ॥ गोसावी-नंदन ह्मणे सर्वांला ॥ थट्टेला भिऊन तुह्मी चाला ॥ नाहींतर नेइल नरककुंडाला ॥ अशीही थट्टा ॥ भलभल्यासी लाविला बट्टा ॥ ७ ॥

## १६८ प्रारब्ध.

ऐका प्रारब्धाची ठेव ॥ भिक्षुक झाले पांडव ॥ धन घोडे भाग्य सर्व ॥ सांडिला ठाव प्रारब्धें ॥ १ ॥ शरीरसंचिताधीन ॥ धर्मराज हिंडे वनोवन ॥ कर्में बुडाला रावण ॥ दुर्योधन प्रारब्धें ॥२॥ अभिमानी शिशुपाळ ॥ ईश्वराहातीं झाला काळ ॥ यादव बुडाले सकळ ॥ त्यांसीं दुःख प्रारब्धें ॥ ३ ॥ कर्मबुद्धीचें तें सुख ॥ अति मानिताती मूर्ख ॥ चंद्रासी कलंक ॥ त्यासीं दुःख प्रारब्धें ॥ ४ ॥ कर्मरेषा रे टळेना ॥ बाण लागला जगजीवना ॥ कृष्णें सांडिल्या गोपांगना ॥ नारायणें प्रारब्धें ॥ ५ ॥ हरिश्चंद्र तारामती ॥ घोर जन्मांतर भोगिती ॥ नळराजा तो पुरुषार्थी ॥ त्यासीं दुःख प्रारब्धें ॥ ६ ॥ पतिव्रता सुशील ॥ दमयंती पापपोळ ॥ असे अनिवार कपाळ ॥ तिशीं दुःख प्रारब्धें ॥ ७ ॥ राज्य सोडिलें रघुवीरें ॥ सर्व मिळूनियां वानरें ॥ पायीं फिरे देशांतरें ॥ त्यासीं दुःख प्रारब्धें ॥ ८ ॥ तें फिरतां काप झालें ॥ पुढें प्रारब्ध ओढवलें ॥ जानकीसी राक्षसें नेलें ॥ तिशीं

दुःख प्रारब्धें ॥ ९ ॥ कर्मा आधीन शरीर ॥ परब्रह्म रामचंद्र ॥ रघुपति विष्णूचा अवतार ॥ जन्मांतर ह्मणे नामा ॥ १० ॥

## १६९ लेंक.

मी सद्गुरुची लेंक ॥ भावएक ॥ ध्रु० ॥ बाई मी निसंग धांगडी ॥ फेडिलों प्रपंच लुगडीं ॥ नाकीं नाहीं नथ काडी ॥ माझें नांव ह्मणती आवडी ॥ जगभुलवीख ॥ मी० ॥ १ ॥ सद्गुरु माझा चंद्रमौळी ॥ माझ्या कांखेस देउन झोळी ॥ मजला हिंडवा आळोआळीं ॥ जन ह्मणती मज सुकाळी ॥ बहुसुख ॥ मी० ॥ २ ॥ गुरुनें मज पाजिलीभांग ॥ मग घडला संतसंग ॥ गुरुगुह्य मजला सांग ॥ मारुनी हाक ॥ मीस० ॥ ३ ॥ ऐसी ह्मणे मुक्ताबाई ॥ जाहो शरण गुरुचे पायीं ॥ पुनः जन्ममरण नाहीं ॥ ऐसी भाक ॥ मी० ॥ भावएक ॥ मीस० ॥ ४ ॥

## १७० नगर.

एक मीं देखिलें नगर ॥ एक० ॥ नव दरवाजे दशवें द्वार ॥ नवद० ॥ तेथें राजा रघुवीर ॥ ऐक सखया ॥ध्रु०॥ परापश्यंती मध्यमा ॥ परा० ॥ चौथीवैखरी ती जाणा ॥ चौ० ॥तेथें वाजे रुणझुणा ॥ साक्षपेरा ॥ एक० ॥ १ ॥ सहस्रदळ औटपीठ ॥ सह० ॥ अवघा भरलासे दाट ॥ अ० ॥ तेथें मूळमायेचें पीठ ॥ श्रीरामाचें ॥ एक० ॥ २ ॥ अखंड झालासे उबारा ॥ अखंड०

॥ निरंजनीं त्यासीं थारा ॥ नि० ॥ गोपाळनाथ निजमाहेरा ॥ सखया० ॥ ए० ॥ ३ ॥

## १७१ मोहनी.

कसी मोहनी घातली गुरुन ॥ मसीं वेडच गेलें भरून ॥ ॥ ध्रु० ॥ श्रवणांत पेरणी केली ॥ ती नयनीं उजेडा आली ॥ पवन मन चित्त एक करून ॥ म० ॥ १ ॥ ऐकतां गजर भूल पडली ॥ विज आकाशांत कडकडली ॥ मनपवन चित्त दृढ धरून ॥ म० ॥ २ ॥ नऊ ग्रास घालितां मुखीं ॥ दहाव्यांत झालें मी सुखी ॥ अकरावे घरीं नेऊन ॥ म० ॥ ३ ॥ नरहरीनाथ गुरु भजनी ॥ दास महिपती लागे चरणीं ॥ माझें मीपण गेलें पुसून ॥ मसीं० ॥ ४ ॥

## १७२ वेणी.

भक्तिग वेणी ॥ माझि गुंफाग साजणी ॥ अ० क्र० ॥ चिंता चतुरा चौघी जणी ॥ एका चित्तें घाला वेणी ॥ सद्भावफुलें लावूनी ॥ चौघीग न्हाणी ॥ माझि गुंफाग साजणी ॥ १ ॥ निष्ठा गजदंताची फणी ॥ प्रपंचमळ काढा विंचरुनी ॥ मुक्त केश रुळती चरणीं ॥ भगवद्भजनीं ॥ माझि० ॥ भक्ति० ॥ २ ॥ चंद्रसूर्य तो बिजवरा ॥ मृदराखडी चंद्रकोरा ॥ त्रिगुण चाळा तीन पदरा ॥ आंवळाग वेणी ॥ माझि० ॥ भक्ती० ॥३॥ सगुण

मोत्यें भांगीं भरा ॥ फुल मोराइत फूल मोगरा ॥ पंचरंगी गोंडे भरा ॥ गोफलावूनी ॥ माझि० ॥ ४ ॥ अवघड वेणीचें गुंफणें ॥ सद्गुरुवांचून गुंफिल कोण ॥ सीताराम हात जोडून ॥ भगवद्भजनीं ॥ माझि गुंफागे साजणी ॥ भक्तिग वेणी माझि० ॥ ५ ॥

## १७३ नकल.

काल्याच्या अनिवर वसति तीन गांव ॥ दोन ओसाड एक वसेचिना ॥ १ ॥ वसेचिना तेथें आले तीन कुंभार, दोन थोंटे एक घडीचना ॥२॥ घडीचना त्यानें घडले तीन मडके ॥ दोन कच्चे एक भाजेचिना ॥ ३ ॥ भाजेचिना त्यांत रांधले तीन मूगे ॥ दोनहिरवे एक शिजेचिना ॥ ४ ॥ शिजेचिना तेथें आले तीन पाहुणे ॥ दोन रुसले एक जेवीचना ॥ ५ ॥ जेवीचना त्याला दिल्या तीन ह्मशी ॥ दोन वांझ्या एक फळेचिना ॥ ॥ ६ ॥ फळेचिना तिला झाले तीन टोणगे ॥ दोन मेले एक वांचेचिना ॥ ७ ॥ वांचेचिना त्याचे आले तीन रुपये ॥ दोन खोटे एक चालेचिना ॥ ८ ॥ चालेचिना तेथें आले तीन पारखी ॥ दोन आंधळे एका दिसेचना ॥ ९ ॥ दिसेचना त्याला मारल्या तीन बुक्या ॥ दोन हुकल्या एक लागेचिना ॥ १० ॥ ज्ञानदेव ह्मणे याचा तो अनुभव ॥ सद्गुरुवांचोन कळेचिना॥११॥

## १७४ कांडण.

विवेक कांडणीं कांडिते साजणी ॥ निजबोध स्मरणीं फिरत-
े ॥ १ ॥ देह हें उखळ मन हें मुसळ ॥ कांडिले तांदूळ
वेवेकाचे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं कांडण कांडितां ॥ ब्रह्मसायु-
ज्यता प्राप्त झाली ॥ ३ ॥

## १७५ दत्तात्रय.

दत्तात्रय अवधूता जनार्दनस्वामी एकनाथा ॥ गुरु दतात्रय
॥ ध्रु० ॥ दत्तनामें करितां ध्यान, वाटे बहु सिंधू समान ॥
ऐकोनियां नामस्मरण, काळ भयाभीत होता ॥ १ ॥ ब्रह्मा
आणि हरिहर तिन्हीं, मूर्तीचा अवतार, जडमूढ उद्धराया
जीवा, झाली अनुसूया सुता ॥ २ ॥ भागीरथीचें नित्यस्नान,
कोल्हापुरीं भिक्षाटण, माहुरगड निद्रास्थान. अलक्षलक्षली मा-
ता ॥ ३ ॥ दिगंबर तें रूपकेसरी, समाधी स्थान अलकापुरीं,
शिवदिन जोडोनि नमन करी, निशिदिन हरिगुणगाता ॥ ४ ॥

## १७६ आत्मज्ञान.

प्राप्त होउनी नरकाया ॥ निर्फळ शतवर्षे गेलीं वायां ॥
आला कोठुन या ठायां ॥ आपला नाहीं पाहिला मुळपाया ॥
मोहुन धनसुत जाया ॥ झोंकामध्यें लागला वागाया ॥ द्रव्य
ठेवीं सांचवून ॥ किरकिर आत्मज्ञानावांचून ॥ काय ग्रंथ वाचुन

॥ १ ॥ ध्रु० ॥ प्राप्त० ॥ जेणें पाहिला साचा ॥ ज्योतिरूप डोळा डोळियाचा ॥ काळियांत काळ्याचा ॥ तेथं प्रकाशनिळ्या स्वरूपाचा ॥ तो ठिकाण प्राणियाचा ॥ ज्योतिमध्यें जोती ढिगतेजाचा ॥ ब्रह्मबीजाची खूण ॥ किरकिर आत्मज्ञानावांचून ॥ काय ग्रंथ वाचून ॥ २ ॥ औटपिठ गिरि वरती ॥ शिखरीं एक गाय सुंदर चरती ॥ जे कां तिला स्मरती ॥ अमृतकुंभ दुग्ध भरणाभरती ॥ सर्व जीवां निर्मिवती ॥ साधु सावित्री तिजला ह्मणविती ॥ ती घ्यावी वळखून ॥ किरकिर आत्मज्ञानावांचून ॥ ३ ॥ शरण गुरूला जावें ॥ आपलें आत्मरूप वळखून घ्यावें ॥ विश्व ब्रह्म जाणावें ॥ तेव्हां स्वयें आपण ब्रह्म व्हावें ॥ ब्रह्मसुख भोगावें ॥ हयबती ह्मणे तरिच जन्मा यावें ॥ व्यर्थ काय वांचून ॥ किरकिर आत्मज्ञानावांचून ॥

## १७७ दत्तात्रय

ब्रह्मगिरविर गुंफा त्यामध्यें दत्तात्रय अविनाशी ॥ निर्गुण सैली त्याशी शोभे चिताभस्म अंगीं ॥ ध्रु० ॥ तो योगी वीतरागी आपेंआप ॥ वाजवितो शिंगी ॥ न कळे अंत त्याचा ॥ नित्य आनंद सुख भोगी ॥ ब्रह्म० ॥ १ ॥ दंडकमंडलु घेउनि हातीं ॥ पवनरूपीं रमतो ॥ ब्रह्मांडामध्यें फेरी करुनी ॥ निरंजनीं राहतो ॥ ब्रह्म० ॥ २ ॥ चौवेदांचा साक्षी होउनी ॥ उनमनीसह

रमला ॥ सत्रावीचें पाणी पिउनी ब्रह्मानंदीं धाला ॥ ब्रह्म० ॥ ३ ॥ अनंतनामीं अनंतरूपीं न कळे वेदांसी ॥ भावें स्मरतां सदां आनंद तुळसीदासासी ॥ ब्रह्मगिरीवर० ॥ ४ ॥

## १७८ गुरुमहिमा.

सखी पुसे सखयेसीं ॥ सद्गुरुची महिमा कैसी ॥ तें गुज सांगें मजपासीं ॥ सखये बाई ॥ १ ॥ सद्गुरुराज दयाळ मोठा ॥ तोडी अहंकाराच्या वाटा ॥ नेउन बसवी मूळपीठा ॥ सखये बाई ॥ २ ॥ काया वाचा मनोभावें ॥ सद्गुरुला शरण जावें ॥ आपुलें स्वहित विचारावें ॥ सखये बाई ॥ ३ ॥ तुका ह्मणे अहो बाई ॥ ऐसें नवल सांगुंकाई ॥ पुन्हां जन्म मरण नाहीं ॥ सखये बाई ॥ ४ ॥

## १७९ दासी.

मी सद्गुरुची दासी ॥ जाहलें उदासी ॥ धृ० ॥ बाई मी सांडिला काम धंदा ॥ निशिदिन लागलें त्या छंदा ॥ जन करिती माझी निंदा ॥ झालें पीसी ॥ मीस० ॥ १ ॥ सांडिली लौकिकाची चाड ॥ मन झालें माझें वेड ॥ कोणी न बोलती धड ॥ आसपासी ॥ मीस ० ॥ २ ॥ सोडिलें प्रपंचाशी पाणी ॥ आतां माझे नाहीं कोणी ॥ मी एक समर्थ केला धणी ॥ जीवाचा अविनाशी ॥ मी सद्गुरुची दासी० ॥ ३ ॥ आतां कोणी

कांहीं बोला ॥ मांथा मोकळा मीं केला ॥ विठ्ठलनाथ नाहीं ऱ्या-ला ॥ धरिला कासीं ॥ मी सद्गुरु ॥ ४ ॥

## १८० चेली.

मी सद्गुरुची चेली ॥ झालें मतवाली ॥धृ०॥ गुरुनें धरिला माझा हात ॥ नेलें महाकारण वनांत ॥ दाखविली आत्मजोत ॥ गुरुची किल्ली ॥ मीस० ॥ १ ॥ चवशून्याचे शेजेवरी ॥ सच्चिदानंद निद्रा करी ॥ लागली उन्मनी खेचरी ॥ वासना गेली ॥ मीस० ॥ २ ॥ प्रकाश पडलासे घनदाट ॥ अवघा दिसतो लखलखाट ॥ वाद्यें वाजती अचाट ॥ पडली भूली ॥ मी सद्गुरुची चेली ॥ ३ ॥ झाला स्वरूपाचा निर्धार ॥ प्रकाशामध्यें झालें गार ॥ विठ्ठलनाथ गुरुपदीं स्थीर ॥ बुद्धी दिधली ॥ मी सद्गुरुची चेली ॥ ४ ॥

## १८१ वेडी.

मी सद्गुरुची वेडी ॥ नवें घड फाडी ॥ धृ० ॥ सुटली प्रपंचा-ची आस ॥ देहभानवि उरलेंनसे ॥ लागलें स्वरूपाचें पिसें ॥ टाकिला पदर मोकळे केश ॥ जाहलें मी उघडी ॥ मीस० वे० ॥ १ ॥ झाला कर्माचा मातेरा ॥ टाकुनी दिधलेंसे भ्रतारा ॥ आग लागली संसारा ॥ सोडुन दिधलें पांच पोरां ॥ केलीघरबुडी ॥ मीस० ॥ २ ॥ उदास झालें बाई मोकळी ॥ आतां मला

कोण आकळी ॥ तुटली कर्मांची सांकळी ॥ हिंडूलागलें आळों-आळीं ॥ झालें जगझोडी ॥ मी० ॥ ३ ॥ आतां कैचें घरदार ॥ नाहीं मीपणाचा भार ॥ रूप भरलें चराचर ॥ विठ्ठलनाथ गुरुपदीं स्थीर ॥ दिधलीबुडी ॥ मी सद्गुरुची वेडी ॥ ४ ॥

## १८२ बेटी.

मी सद्गुरुची बेटी ॥ सावध मोठी ॥ ध्रु० ॥ चार सहा अठराजणी ॥ आणिक बारा सोळाजणी ॥ कितीक फिरती रानोरानीं ॥ गिरीकपाटीं ॥ मीस० ॥१॥ बहुतीं केला माझा लाग ॥ परी मज घडलानाहीं संग ॥ तेथुनी झालें मी निःसंग ॥ मोठी हट्टी ॥ मीस० ॥ २ ॥ बाइ मी जहाले कर्णकुमारी ॥ बाप माझा ब्रह्मचारी ॥ मायबापाची मी प्यारी ॥ नाम मंत्राची सुंदरी ॥ त्रिगुणपोटीं ॥ मीस० ॥ ३ ॥ बाइ माझें राहणें एकांत ॥ निर्गुणपुरुष माझा कांत ॥ नकळे कोणा माझा अंत ॥ ध्या-नीं भरला विठ्ठलनाथ ॥ शामपोटीं ॥ मी स० ॥ सावध मोठी॥४

## १८३ गाय.

एक गाय चुकली तानी ॥ वरल्यारानीं ॥ ध्रु० ॥ गाइचागोरा मनपवन ॥ चारा चरतअसे अस्मान ॥ वरच्या वरच पीई पा-णी ॥ तो अस्मानीं ॥ एकगाय ॥ १ ॥ नागिणी पद्मिणी गा-इचीं वेणी ॥ कपाळीं चंद्रसूर्यदोनी ॥ माळा घातल्या संतांनीं ॥

त्याचे योग्यानीं ॥ एकगाय० ॥ २॥ गायशंभूच्याशिखरीं ॥ तीनताळ शिंगावरी ॥ लिंगं फुटलीं शरीरीं ॥ गाइ लागोनी ॥ एकगाय० ॥ ३ ॥ नाथह्मणे अवघें वन ॥ एवढी गाय द्यावी सांगुन ॥ मग करा तुह्मी गायन ॥ सभारंगणीं ॥ एकगाय० ॥ ४

## १८४ मांजर.

एक घर मांजर व्याली ॥ सात घर फिरली ॥धृ०॥ माजघरीं नौबत आहे ॥ न वाजवितां वाजत आहे ॥ आकाशाची पाहनां सोये ॥ एक तेथें खोली ॥ एक० ॥ १ ॥ दोन घरे आहेत भिंगांचीं ॥ आंत मूर्ति श्रीरंगाची ॥ तेथें वाटना जायाची ॥ चौकी बेसली ॥ एक० ॥ २ ॥संतांघरची वोळखुन वाट ॥ तेथें आहे एक बोट ॥ गोपाळनाथ गुरूची गोष्ट ॥ सत्य बोली ॥ एक० ॥ ३ ॥

## १८५ मेंढया.

स्थिरहंस चालल्या मेंढया बावन खंड्या ॥ धृ० ॥ चालला स्थिरमेंढयांचा भार ॥ आधारचक्रीं चरती चार ॥ स्वाधिष्ठानीं सहा सरदार ॥ बार बेंड्या । स्थिरहंस० ॥१॥ मनपुरीं चरती दाहाजणीं ॥ करती किरकिर पीती पाणी॥ शब्द अनुहात त्रिगुणीं ॥ बावन खंड्या ॥ स्थिर हंस० ॥ २ ॥ बारा पुढें चालल्या सोळा ॥ सोळापुढें चार वोढाळा ॥ स्थिर घेती त्या उल्हा-

ळा ॥ तांबडतोंड्या ॥ स्थिर हंस चालल्या मेंढ्या ॥ ३ ॥ लागले तीन खांडगे पाठी ॥ मेंढ्या पिटिल्या गिरिकपाटीं ॥ मेंढक्या हातीं घेउनी काठी ॥ मूळचावेंड्या ॥ स्थिरहंस० ॥ ४ ॥ आधीं ॐकार मेंढक्या भला ॥ त्यानें अवघ्या केल्या गोळा ॥ गोपाळनाथें खुणें दासाला ॥ लाविल्या मेंढ्या ॥ स्थिर० ॥ ५ ॥

## १८६ उलटीखूण.

नाथाचे घरचीं उलटीच खुण ॥ पाण्याला मोठीच लागली तहान ॥ धु० ॥ एकबाईमी नवल देखलें ॥ वळचणीचें पाणी आढ्यास गेलें ॥ नाथा० ॥ १ ॥ आंतमध्यें घागर बाहेर पाणी॥ पाण्याशीं पाणी आलें बांधुनी ॥ ना० ॥ २ ॥ शेतपेरिलें त्याशी कणीस हो आलें ॥ राखणवाल्याशीं त्याणें गिळिलें ॥ ना० ॥ ३ ॥ मडकें खाऊन भात टाकुनदिला ॥ बकऱ्याचें पुढं देव कापिला ॥ नाथा० ॥ ४ ॥ श्रीधरस्वामी ह्मणे मार्गहे उलटा ॥ जाणेल तोची गुरुचा बेटा ॥ नाथा० ॥ ५ ॥

## १८७ मोरीण.

सोहं मोरणी, मोरणीगे साजणी ॥ गुरूनें दिली होती आंदणी ॥ धु० ॥ सप्तधातूंचें, धातूंचें कांचन ॥ घोंटिलें बहुतां युक्तीन ॥ नव रंगाची, रंगाची नवरत्नें ॥ बसविली कारागीरानें ॥ अस्सल तिन हीरे, हीरे तिनगुण ॥ सुरती मोत्यें वर

दोन ॥ राखडीवर सरजे, सरजेहोदोन ॥ जसें चंद्राचें चांदणें ॥ उलट वर फांसा, फांसा बसवून ॥ गु० ॥ १ ॥ रत्नमाणिकहें, माणिकहें अद्भुत ॥ लसण्यावर जडली प्रीत ॥ शामरंगाचा, रंगाचा लोलक ॥ केवळ रजनीचा सूत ॥ श्वेतकर्पूर, कर्पूरा ऐसिकांत ॥ बसविला हिरकणी सहीत ॥ केली एकाकीं, एकाकीं जडणी ॥ गुरूनें० ॥ २ ॥ चमके वर नीळ, नीळ सद्रेचा ॥ सुनीळ गाभा गगनाचा ॥ आंत बहु जडाव, जडाव रत्नांचा ॥ प्रकाश अनंत सूर्यांचा ॥ डौलहा कैसा, कैसा मायेचा॥ दाविला झोंक मोरणीचा ॥ खवळला काम, काम योगियांचा ॥ लोपला प्रकाश वस्तूंचा ॥ झाली झांपडी, झांपडी ब्रह्मभुवनीं ॥ गुरूनें ॥ ३ ॥ ऐसी हे माया, माया मोरणी ॥ नव रंगाचं हें पाणी ॥ गुंतले महान्; महान् सिद्ध मुनी ॥ अगाध मायेची करणी ॥ शिवलिंग बोले, बोले ऐशी वाणी ॥ लागला सद्गुरुचे चरणीं ॥ सोहं मोरणी ॥ मो० ॥ ४ ॥

## १८८ बाग.

गुरुरायानें नवलाव केला ॥ देह अपूर्व बाग दावीला ॥ ध्रु०॥ तया बागेचें नवल सांगूं काई ॥ साडेतीन चाहूर बागशाई ॥ आंत पेरिली पंचरंगी जाई ॥ धन्य कर्त्याची कारागिरि बाई ॥ गुरु० ॥ १ ॥ तया बागेंत असे एक विहीर ॥ मोट

सत्रावी वाहे निरंतर ॥ मन पवनाचे लावुनिया दोर ॥ सोहं-भक्तीचें बळ असें फार ॥ गुरु० ॥ २ ॥ तया बागांत असे एक माळीण ॥ तिला वर असती दोघेजण ॥ एक भोगी तव एक जाय मरून ॥ एक जिवंत होतसे फिरून ॥ गुरु० ॥ ३ ॥ ऐसें केलें सद्गुरुरायानें ॥ मज दाविली अंतरीं खुण ॥ काय उतराई-होउं त्याशी जाण ॥ वारंवार निवृत्ती वंदी चरण ॥ गुरु० ॥ ४ ॥

## १८९ माळी.

निर्गुणमाळ्यांनीं हो माळ्यांनीं ॥ एक बाग लाविला जाणी ॥ ध्रु० ॥ ओट हाताचें एक वावर ॥ वरि धरिला नांगर काम क्रोध मदमत्सर ॥ बैल जुंपिले चार ॥ हातीं ज्ञान अखंड घेउनी॥१॥ एकविस स्वर्गावरती एक विहीर ॥ तिला उफराटे पाझर ॥ माळी सत्रावी सुंदर ॥ वाफे बाहात्तर ॥ पाणी लावितसे पाटानें ॥२॥ बावन चांफे हो चौफेर ॥ चौदांचें मूळघर॥ तीनशेंसाठ जाइ मोगरा ॥ एकविस आंबे थोर ॥ पाणी लावीं नित्यानें ॥ ३ ॥ बाग पंचरंगीं फुलला ॥ माळी दंग जाहला ॥ जिवाशिवाचावर ॥ त्याला धोंडी गुंडी बोलला ॥ ऐका सद्गुरुस्मरणें ॥ ४ ॥

## १९० पांखरूं.

राई एकर्डे पांखरूं दादा त्रिभुवनीं त्याचा थारा ॥ ध्रु० ॥

नर आणि नारी त्याचा ॥ पांखराचा चारा ॥ पिंडीं आणि ब्रह्मांडीं त्याचा अनुभव तुह्मीं करा ॥ त्याचा अनुभव घेतां चुकेल चौऱ्याशींचा फेरा ॥ राई० ॥ १ ॥ एकविस स्वर्गांवरती त्याचा ॥ पांखराचीउंची ॥ डोळ्यांतिल बाहुली त्याचा ॥ पांखराचीनीची ॥ सप्त हे सागर ॥ पांखरूं घेऊन गेले चुंची ॥ राई० ॥ २ ॥ पिंड आणि ब्रह्मांड मछिंद्रनाथानें दाविलें ॥ त्याच्या अनुग्रहें गोरक्षनाथानें ओळखिलें ॥ तयाच्या प्रसादें म्या शिष्यानें गाइलें ॥ राई० ॥ ३ ॥

## १९१ बाभळ.

गांवावरी एक बाभळ ॥ खालीं शेंडा वरती मूळ ॥ खालीं कळस वर देऊळ ॥ गत आहे न्यारी ॥ तमाशा संतांघरीं ॥ निर्गुणपुरीं ॥ ध्रु० ॥ फुला आधीं गुंफिलातुरा ॥ त्याचा अर्थ करीं चातुरा ॥ कोण सद्गुरुघरचापुरा ॥ असेल चतुरा ॥ खोंविला शिरीं ॥ तमाशा संतांघरीं ॥ २ ॥ धोंडा रोंउनी बांधिला खुंट ॥ नगाऱ्यावर चढविला उंट ॥ कोण सद्गुरुचा पुतळा असेल बळिवंत ॥ अर्थ विचारी ॥ तमाशा संतांघरीं० ॥ ॥ ३ ॥ दिवा वाऱ्या घालितसे शेव ॥ ह्याचा घ्याहो तुह्मीं अनुभव ॥ तुका वैकुंठींचाराव ॥ गतआहे न्यारी ॥ तमाशासं० ४॥

## १९२ मुरशदमौला.

है कोय ऐसा मुरशदमौला ॥ घरमों खुदा बतावेगा ॥ है० ॥

॥ धृ० पंचतनके दरगाभीतरा ॥ दिलतकया बिछावेगा ॥ मन-मुकामें मुजे बिठाकर ॥ बिस्मल्ला कलमा पढावेगा ॥ हैकोप० ॥ ॥ १ ॥ अरषकुष दीधा रजोरामारहीममेरा दिखावेगा ॥ च-वदा तबकके आंदर सुन्यकें मरेतय झुलझलावेगा ॥ हैकोप० ॥ ॥ २ ॥ बावन हारपके मायने बताके भेदभरमकु मिटावेगा ॥ उसके आंदर मुजले ज्याके किताबके बयान शिकावेगा ॥ है कोप० ॥ ३ ॥ कहे कमाल कबीरका बालक मनकिताब सु-नावेगा ॥ मेरा चेरा मुजे बताके नरनबि मिलावेगा ॥ है कोप० ॥ ४ ॥

## १९३ वैद्य.

वैद्यें गुण केला बा गुण केला ॥ संशय अवघा हरिला ॥धृ०॥ भवरोगाचा झाडा ॥ आत्मप्रतीति देउनी पुढां ॥ वैद्येंगु० ॥१॥ नव्हमळ जीवपणाची भारी ॥ औषधें देउनि केली दुरी ॥ वैद्यें गु० ॥ २ ॥ शांतिसुखाचें पथ्य ॥ मन मारुनि केलें हीत ॥ वैद्येंगु० ॥ ३ ॥ गोपाळनाथ ह्मणे मी रोगी ॥ सद्गुरु वैद्य मि-ळाला वेगीं ॥ वैद्येंगु० ॥ ४ ॥

## १९४ कायानगर.

कायानगरमां कायानगरमां बोलता कोन ॥ धृ० ॥ आपहि माली आपहि ख्याली ॥ मालीका चुननेवाला कोन ॥ १ ॥

आपहि काजी आपहि मुलना ॥ काजीका पालनवाला कोन ॥ २ ॥ आपहि साधू आपहि पोथी ॥ पोथीका बाचनेवाला कोन ॥ ३ ॥ कहत कबीरा सुनोभाई साधू ॥ साधुका पालनवाला कोन ॥ ४ ॥

## १९५ फूल.

एक फूल फुला पंचरंगका खुब बाग ॥ धृ० ॥ निर्गुण फूलफुला सुंदर ॥ उलटें कुवेकूं पाझर ॥ चाकफिरता पवन उपरें ॥ मालीदंगा ॥ १ ॥ बाग मालीनें सवारा ॥ दरकत रंग रंगसेंन्यारा ॥ उसमें बैठा पालनवाला ॥ लगायालाग ॥ २ ॥ बागशिखरकेऊपर ॥ आपा फनाकनिका फेरा ॥ सद्गुरु गोपालनाथ क्षार ॥ वाजतांचंग ॥ ३ ॥

## १९६ मठ.

दोहीं मठ बांधिला ज्यानें ॥ योगीयानें ॥ ध्रु० ॥ आत्मा गोंसावी निर्गुण ॥ त्याचे शिष्य पांचजण ॥ पांच प्राण आणि उदान ॥ करीजतन ॥ १ ॥ दहा दरवाजे मठाला ॥ दोनी द्वीपद्वारें त्याला ॥ योगी बसले निरंजनाला ॥ अग्नीच्या जळताती ज्वाळा ॥ तें पाहून ॥ २ ॥ पाण्यामध्यें जळतें पाणी ॥ धन्य देवाची करणी ॥ विरळा जाणें गुरुज्ञानी ॥ देव पृथ्वीचा धनी ॥ करीपाळण ॥३॥ पाणी भरलें नाभीकमळीं ॥ अंतरबाह्य

धुमी चालली ॥ गुरुपुत्रानें पाहिली ॥ द्यावी सांगून ॥ ४ ॥ तुकाराम पुसे ह्मण ॥ इतकें द्यावें मज सांगून ॥ नाहींतर करावें श्रवण ॥ धरावें ध्यान ॥ ५ ॥

## १९७ कावड.

मनासबा आधीं कावड घेतली खांदी ॥ मिळाली संतमांदी ॥ त्यांचे चरण रजरेणु वंदिरे कापड्या ॥ शिवनाम शीतळमुखीं शिवकापड्यारे ॥ दड दड दड दड दुड दुड दुड दुड पळ सुटला कळिकाळा बापुड्यारे ॥ ध्रु० ॥ गुरु लिंगहो जंगम ॥ त्याणें दाविला आगम ॥ अनुभव करी श्रम ॥ तेणें पावशी विश्रामरे कापड्या ॥ २ ॥ जवळीं असतां जगज्जीवन ॥ कांरे धुंडाळिसी वन ॥ एकाग्र करीं मन ॥ तेणें होसी समाधानरे कापड्या ॥ ॥ ३ ॥ सांडी देह अभिमान ॥ संतांघरीं शुद्धज्ञान ॥ इतुकें देई कृपादान ॥ तेणें वडे अमृतपानरे कापड्या ॥ ४ ॥ क्षुधा तृषा हरे ॥ निजभाव येणें सरे ॥ हें जीवन सांगितलें ॥ बाप रुक्मादेवी वर श्रीविठ्ठलारे कापड्या ॥ ५ ॥

## १९८ मल्हारी.

अनंत युगांचा देव्हारा ॥ निजबोधचा घुमारा ॥ आंगीं आउतीचा भरला वारा ॥ या मल्हारी देवाचा ॥१॥ सत्वाचा केवढा मोठा ॥ ध्रु० ॥ बोध ब्रीद बांधिला गांठा ॥ आंगीं वै-

राग्याचा पट्टा ॥ दावीं वाटा भक्तीच्या ॥ २ ॥ उद्गार कोठं बा सांगाती ॥ घोळ वाजवी अनुहातीं ॥ ज्ञानभंडाराचें पोतें ॥ रितें नव्हे कल्पांतीं ॥ ३ ॥ लक्षचौऱ्यांशीं घरचारी ॥ या देवाची केली वारी ॥ प्रसन्न झाले देवमल्हारी ॥ सोहंभावें राहिलों ॥ ४ ॥ या देवाचें भरतां वारें ॥ गुरगुर करी वेडेचारे ॥ आंगीं प्रेमाचें फेंफरें ॥ दास तुकया भुकेना ॥ ५ ॥

## १९९ घुंगुरु.

पग घुंगुरुरे पग घुंगुरुरे ॥ पगघुंगुरु बांधकर नाचोरे ॥ ॥ ध्रु० ॥ मैं अपने तो नारायनकी ॥ अबदासीरे ॥ १ ॥ लोक कहे मीराभई बावरी ॥ बापकहे कुलनासीरे ॥ २ ॥ मीराके प्रभू गिरिधर नागर ॥ चरन कमल बल्हारीरे ॥ ६ ॥

## २०० सांगड.

सांगड बांधारे भक्तीची ॥ रघुनाथ नामाची ॥ ध्रु० ॥ संसार सागर सागर ॥ भरला जातो पूर ॥ १ ॥ लाटा उसळती विषयाच्या ॥ बहुतां प्रपंचाच्या ॥ २ ॥ माणकोजी बोधला बो बोधला ॥ हरिनामीं रंगला ॥ ३ ॥

## २०१ जातें.

सुंदर माझें जांतेंग फिरतें बहुत ॥ ओंव्या गाऊं कौतुकानें ॥ येरेबा विठ्ठला ॥ ध्रु० ॥ जीव शीव दोन्हीं खुंटेगे ॥ लावुनि

पांचीं बोटेंगे ॥ पाच्या बाई नेटेंगे ॥ १ ॥ सत्वाचें आधण ठेविलें पुण्यवैरिलें ॥ पाप उतोनि गेलें बा विठ्ठला ॥ २ ॥ बारा सोळा गडणी अवघ्या साजणी ॥ आशा त्यावी सोडूनी येरे बा ॥ ३ ॥ सासु आणि सासरा दिसतो तीसरा ॥ ओव्या गाऊं भ्रतारा येरेबा ॥ ४ ॥ प्रपंच दळीं भरिलें पीठ म्यां भरिलें ॥ नेऊनीया सासुपाशीं दिधलें ॥ ५ ॥ जनिह्मणे जातें जाइल किर्ती राहील ॥ प्रकट बोलूंनये जनांत मात ॥ ६ ॥

## २०२ कृष्णाबाई.

मुक्ता फळी नथ नाकीं ॥ चरणीं ल्याली वाळे वांकी ॥ पीतांबरं आंग झांकी ॥ कृष्णा मामाजी ॥धु०॥ खांद्यावरी घाबळी ॥ पाय घोळ लांब बरी ॥ पांघरळी धाबळी ॥ कृष्णा० ॥ ॥ १ ॥ गाई पाठीं लागली ॥ पळतां नाहीं भागली ॥ माय बहिण चांगली ॥ कृष्णा० ॥ २ ॥ देहुडापावली ॥ उभी माझी माउली ॥ विश्रांतीची साउली ॥ कृष्णा० ॥ ३ ॥ उभानीट विटेवरी ॥ उभा भीवरेचेतीरीं ॥ नाम याचा कैवारी ॥ कृष्णा मामाजी० ॥ ४ ॥

## २०३ पंतोजी.

गुरु माझा पंतोजी भला ॥ त्याणें लिहिणें शिकविलें मला ॥ धु० ॥ ओंकार जाणीजे नामस्मरणीं चित्त असूंदे तूझें ॥

बा मानवदेहीं आलासीं काजें ॥ शिवाजिवाची वळख असूंदे तुला ॥ १ ॥ धमधमा वाजे अनुहात ॥ आकार जितका तितका नाशवंत ॥ इकार साहे जनाचे देहांत ॥ उमाकांत हा सर्व घटीं भरियेला ॥ २ ॥ रिकामा कांरे करितोसी शीण ॥ लिखीत कपाळीं घातलें ब्रह्मियान ॥ एक व्यापक जिकडे तिकडे श्रीभगवान ॥ वासना ज्याची निमाली जाण ॥ आंगावरतीं ज्ञानठसा दिला ॥ ३ ॥ गुरुज्ञानराज भाउली ॥ त्याणीं विवेक लेखणी दिधली ॥ सर्व अक्षरें दाविलीं ॥ धोंडीनाथाला ॥ ४॥

## २०४ तलफ.

निजलिस कायगे ॥ होय जागी तमाखू खायगे ॥ ध्रु० ॥ चंचित नाहींतर बटव्यांत पाहिगे ॥ बटव्यांत नाहींतर गाडग्यात पाहिगे ॥ गाडग्यांत नाहींतर फडक्यांत पाहिगे ॥ निजलि० ॥ १ ॥ तमाखू आणुन करतेस कायगे ॥ माझ्या कोईंत चुनाच नाहींगे ॥ रात्रीं मजला झोंपचि नाहींगे ॥ निजलिस० ॥ २ ॥ पहांटेस उठून शेतांत जाईंगे ॥ वायसी पदरांत घेऊनि येईंगे ॥ वायशी मध्वनाथाला देईंगे ॥ निजलिस० ॥ ३ ॥

## २०५ पद.

दत्तात्रय अवधूता ॥ जनार्दन स्वामी एकनाथा ॥ गुरुदत्तात्रय ॥ ध्रु० ॥ दत्त अवधूत, अवधूत निराकार, स्मरणीं पावे

सत्वर ॥ शुद्ध अविनाश, अविनाश सुंदर ॥ स्वरुप हें दिसे मनोहर ॥ पतित मी पापी, पापी दुर्धर, नेई तूं भवसिंधूपार ॥ मांगणें हेंचि, हेंचि सत्वर, मस्तकी ठेवीं अभयकर ॥ सगुण हें रुप, रूप दावीं आतां ॥ जनार्दन स्वामी एकनाथा ॥ गुरु दत्ता० ॥ १ ॥ मुख्य निवास, निवास मेरुशिखरीं ॥ समाधी निद्रा माहूरीं ॥ स्नान सारिलें, सारिलें गंगातीरीं ॥ टिळकरेखिला पंढरीं ॥ मध्यान्ह भिक्षा, भिक्षा करवीरीं ॥ भोजन केलें कावेरी ॥ सायंसंध्या, संध्या सागरीं ॥ मुख्य आसन केदारीं ॥ जावुनी चरणीं, चरणिं ठेवुं माथा ॥ जनार्दन स्वामी एकनाथा ॥ गुरुदत्तात्रय० ॥ २ ॥ भस्म भूषीत, भूषीत दिव्य कांती ॥ माळा त्रिशूळ डमरु हातीं ॥ गळां वनमाळा, वनमाळा वैजयंती ॥ कर्णी कुंडलें सूर्यदीप्ती ॥ माथां मुगुट, मुगट चंद्रज्योती ॥ पाहतां वेधली मनोवृत्ती ॥ आकर्ण नयन, नयन मदनमूर्ति ॥ वर्णितां मौनावल्या श्रुती ॥ तेथें मी पामर, पामर काय वर्णु आतां ॥ जनार्दन स्वामी एकनाथा ॥ गुरु दत्ता० ॥ ३ ॥ अत्रि अनुसूया ॥ अनुसूयात्मज दत्त ॥ त्रिगुण अवतार मूर्तिमंत ॥ कटीं मेखळा, मेखळा रत्नजडित, चरणीं नूपुरें रुणझुणित ॥ प्रसन्न हें वदन, वदन हर्षयुक्त ॥ तारिले पतित असंख्यात ॥ अखंड हें नाम, नाम वदनांत ॥ मूर्ति बिंबली हृदयांत ॥ अभय वर देई, देई गुरुनाथा ॥ जनार्दन स्वामी एकनाथा ॥

गुरुद० ॥ ४ ॥ लक्षचौऱ्यांशीं, चौऱ्यांशीं जन्मवायां ॥ म्यां भोगिले गुरुराया ॥ भक्तवत्सला, वत्सला दत्तराया ॥ करावी कृपेची छाया ॥ इच्छितों हेंचि, हेंचि गुरु सखया ॥ निरसी शुद्ध भ्रम माया ॥ मागणें हेंचि, हेंचि गुरुसदया ॥ न्यावें मातें निजठाया ॥ कृष्ण आत्मजातें, आत्मजातें तारिं आतां ॥ जनार्दन स्वामी एकनाथा ॥ गुरुदत्तात्रय, दत्तात्रय अवधूता ॥ जनार्दन स्वामी एकनाथा ॥ गुरुदत्तात्रय० ॥ ५ ॥ ॥ ॥

## २०६ गौळण सहावी.

राधे तुझा रंग पाहुन कृष्ण दंग झाला ॥ राधे हरी दंग झाला ॥ ध्रु० ॥ वेणी फणी करोनी चांग ॥ काजळ कुंकू ल्याली भांग ॥ आंगा मध्यें चोळी तंग ॥ दावी हरीला गोरारंग ॥ राधे तुझा० ॥ १ ॥ राधे तुझा संग झोंक ॥ कृष्ण पाहोनी लावी रोख ॥ जरीपातळाचा झोंक ॥ पदर सांवरीला ॥ राधे तुझा० ॥ २ ॥ मथुरेची गौळण थाट ॥ शिरीं गोरसाचा माठ ॥ चढुन यमुनेचा घांट ॥ पालवी हरीला ॥ राधे तुझा० ॥ ॥ ३ ॥ मथुरेची गौळण वेडी ॥ चालतांना डोळे मोडी ॥ गोपाळनाथ भक्तगडी ॥ चरणीं ठाव दिला ॥ राधे तुझा० ॥४॥

## २०७ गौळण ७ वी.

कसी जाऊं मी वृंदावना मुरली वाजवितो कान्हा ॥ ध्रु० ॥

पहिले तीरीं हरी वाजवी मुरली ॥ नदी भरली यमुना ॥ कसी० ॥ १ ॥ कांसेपितांबर केशरी टिळक ॥ कुंडल शोभे रे काना ॥ कसी० ॥ २ ॥ काय करूं बाई कोणाला सांगूं ॥ हरिनामाची सांगड आणा ॥ कसी० ॥ ३ ॥ नंदाच्याहरीनें कौतुक केलें ॥ जाणे अंतरीच्या खुणा ॥ कसी० ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मनीं म्हणा ॥ देव माहात्म्य कळेना कोणा ॥ कसी जाऊं वृंदावना ॥ ५ ॥

## २०८ गौळण ८ वी.

वारीयानें कुंडल हाले ॥ डोळे मोडीत राधा चाले ॥ राधा पाहुन भुलले हरी ॥ बैल दोही नंदा घरीं ॥ वारी० ॥१॥ फणस जांबुळी कर्दळी दाट ॥ हातीं घेउनी नारंगी फाट ॥ वारि० ॥२॥ हरीला पाहुनी भुलली चित्ता ॥ राधा घुसळी डेरारीता ॥ वारी० ॥ ३ ॥ मन मिळालेंसे मना ॥ एका भुलला जनार्दना ॥ वारीयानें कुंडलहाले० ॥ ४ ॥

## २०९ गौळण ९ वी.

हरी तुझी कांतिहे सांवळी ॥ मीरे गोरी गोमटी चापेकळी ॥ तुझ्या दर्शनें होईन मीरे काळी ॥ मगहें वाळी गांजीती जन ॥ अरे नंदबाळा ॥ उगलाराहे न करी चाळा ॥ उग० ॥ ध्रु० ॥ किती सांगूं तुजरे गोंवळा ॥ तुझा स्वरवडुरे कांवला ॥ अरे नं

दवाळा ॥ उगला० ॥ १ ॥ तुझ्या आंगींची दुग्ध घाणी ॥ चोरून खासी दुर्घट लोणी ॥ घरींचें बाहेरी आणूनी ॥ मीरे चांदणी सकुमार ॥ उगला० ॥ २ ॥ तुज तंव हांसतील हे जन ॥ धिक्कारतील मजला देखून ॥ तुझ्या आंगींचें लक्षण पाहून ॥ मजला होईल विटंबना ॥ उगला० ॥ ३ ॥ तुजतंव लाज भय शंका नाहीं ॥ मज तंव सज्जन लपून पाहीं ॥ आणिक मानसीं तुज सांगू काई ॥ कैसी भीड तुजला माझी नाहीं ॥ उगला० ॥ ४ ॥ वचन मोडून देहांत ॥ कळली निश्चयाची मात ॥ तुकया स्वामी गोपीनाथ ॥ जीवन्मुक्त करूनी भोगी ॥ उगला० ॥ ५ ॥

## २१० जोशी.

मी आलों रायाचा जोशी ॥ होरा ऐकशी ॥ मी आ० ॥ ॥ धु०॥ वासना बायको शेजारीण॥झगडी कुटीळ मोठी दारुण॥ तिचे पायीं नागवण ॥ घर बुडवीलें ॥ मी आलों० ॥ १ ॥ येथून पुढें बरें होईल ॥ भक्ती सुखें दोंद वाढेल ॥ फेरी कर्माची खंडेल ॥ धनी मोकाशी ॥ मी आ० ॥ २ ॥ मदन पाटील देह गांवींचा ॥ विश्वास धरूं नये त्याचा ॥ घात करील नेमाचा ॥ पाडील फांसी ॥ मी आ० ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जोशी ॥ होरा सांगतों लोकांशीं ॥ फेरी चुकवा

चौऱ्यांशीची ॥ शरण रिघावें संतांसीं ॥ मी आलों० ॥ ४ ॥

## २११ सौरीसातवी.

उभी राहे रांडे शब्दचाळ मांडे ॥ शब्दचाळ मांडे० ॥ ॥ धृ० ॥ काजळ कुंकू लेउनी रांडे किती करसील नखरा ॥ किती० ॥ भिल्लीनी होऊनी रुद्र नेला ठकविलें त्या शंकरा ॥ उभी राहे० ॥ १ ॥ त्याही त्रिकूट सहा शास्त्रें तींही वेडावलीं ॥ तींही वे० ॥ चौघी जणी वाद केला त्याहीं धुंदावल्या ॥ उभी राहे० ॥ २ ॥ दुर्वासामी गर्व केला तेथें झालीस घोडी ॥ तेथें झाली० ॥ कोठें म्हणतां लाज नाहीं डांगवियां घोडी ॥ उभी राहे रांडे० ॥ ३ ॥ शुकाशी जाउनी रांडे काय उजेड केला ॥ काय उजेड० ॥ मारुनी ज्ञान बाण तुझा मोहरा फिरविला ॥ उभी राहे रांडे० ॥ ४ ॥ रामदासीं पणुनी तुला लग्नीं टाकून दिलें ॥ लग्नीं टा० ॥ संतसंगती जाणुनियां फार फजीत केलें ॥ उभी राहे रांडे० ॥ ५ ॥

## २१२ सौरीसातवी.

ये सखे माय नवल बोलु काय ॥ धृ० ॥ देवळावरतें देऊळ बाई देखिलें एकाएकीं ॥ देखिलें० ॥ उफाराची पाहूं जातां झालों थोर सुखी ॥ ये सखये माय० ॥ १ ॥ देवळा मध्यें उभी ठेली मूर्त निराकारी ॥ मूर्त निराका० ॥ त्याहा-

ळीतां सई बाई झाली वारासारी ॥ ये सखे मा० ॥ २ ॥ निळी पिवळी शुभ्र वर्ण सांवळी सकूमार ॥ सांवळी० ॥ कस्तुरीचा टिळा भाळीं कांसे पितांबर ॥ ये सखे मा० ॥ ३ ॥ चार मुखें दहा डोळे आठ तिला हात ॥ आठ तिला० ॥ नवखंड पोटीं तिच्या समुद्र आणि सात ॥ ये सखे मा० ॥ ॥ ४ ॥ राई येवढी डोई तिची गंगे येवढी वेणी ॥ गंगे येवढी० ॥ माज बारीक सुईपरी आणामाची राणी ॥ ये सखे मा० ॥ ५ ॥ सद्गुरु कृपा पांडुरंगी प्रसन्न झाली आजी ॥ प्रसन्न० ॥ अनन्य भावें शरण जातां तीच तया राजी ॥ ये सखे माय नवल बोलु काय ॥ ६ ॥

## २१३ हमामा दुसरा.

हमामा पोरा हमामा घुंबरी वाजे घुमामा ॥ ध्रु० ॥ हमामा घाली बाळे ॥ सांडी खोटे चाळे ॥ वांकुल्या दावी काळे ॥ १ ॥ हमामा घाली बारे ॥ आंगीं भरलें वारें ॥ चाखति तिखल चोरे ॥ आह्मीं जाऊं वयला द्वारें ॥ २ ॥ हमामा घाली नेटें ॥ सांडी बोलणें खोटें ॥ आतां पोरा जासी कोठें ॥ कान्होबाचें बळ मोठें ॥ ३ ॥ हमामा घाली सोई ॥ सांभाळी सावध होई ॥ एकजे मरे तूं राही ॥ मग आत्म सुख पाहीं ॥ ४ ॥ हमाम्याचा नाद वाजे ॥ अनुहात कोपर

गाजे ॥ रत्नजडीत मुगुट साजे ॥ बाप रखुमादेवीवर विठ्ठल राजे ॥ २ ॥ ॥

## २१४ बागुल पहिला.

कृष्णाराहींरे उगला ॥ नाहीं तरी सांगेन त्या बागुला ॥ घुमळणासी उशीर झाला ॥ रवी सोड गोविंदा ॥ ध्रु० ॥ पहिला बागुल तो ऐसा ॥ त्याचें नांव ह्मणती मासा ॥ शंखासूर वधिला कैसा ॥ चारी वेद आणिले ॥ १ ॥ दुसरा बागुल बोलत ॥ त्याचें नांव कच्छ ह्मणत ॥ त्यानें पृथ्वी धरली पृष्ठींत॥ पायपोटीं धरियेले ॥ २ ॥ तिसरा बागुल बोलती ॥ त्याचें नांव वराह ह्मणती ॥ त्यानें पृथ्वी धरिली दंतीं ॥ दैत्य फार वधियेले ॥ ३ ॥ चवथा बागुल नरहारी ॥ तो तर खांबांत गुरगुरी ॥ दैत्य वधिला जानूवरी ॥ भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ ४ ॥ पांचवा बागुल ब्रह्मचारी ॥ तोतर उभा बळीचे द्वारीं ॥ भिक्षा मागुन निर्धारी ॥ बळीचें द्वार रक्षिलें ॥ ५ ॥ सहावा बागुल बोलती ॥ त्यास परशुराम ह्मणती ॥ त्यानें वधिलें मातेप्रती ॥ पीतृ वचन मानुनी ॥ ६ ॥ सातवा बागुल सत्वाचा ॥ राम ह्मणती दशरथाचा ॥ रावण वधिला दशमुखांचा ॥ त्यानें जानकी सोडविली ॥ ७ ॥ आठवा बागुल बोलती ॥ तोतर गोकुळीं ह्मणती ॥ त्यानें वधिलें कंसाप्रती ॥ देव सुखी

केलेते ॥ ८ ॥ नववा बागुल बोलती ॥ त्याचें नांव बौध्य ह्मणती ॥ त्याची कळत नाहीं स्थिती ॥ उभा विटे राहिला ॥ ९ ॥ दहावा बागुल बोलती ॥ त्याचें नांव कलंकी ह्मणती ॥ त्याची कळत नाहीं स्थिती ॥ पुढें काय होइलतें ॥ १० ॥

## २१५ बागुल दुसरा.

नको छंद घेऊं कृष्णा आला आला बागुल बुवा ॥ नको० ॥ ध्रु० ॥ पंच मुख दश भुज माथा मोठा जटाभार ॥ गजचर्म पांघुरला कटीं वेष्टिलें व्याघ्रांबर ॥ विभूती चर्चिली आंगीं नीलकंठ दिगांबर ॥ त्रिलोचन उग्ररूपी भयंकर बाबा ॥ नको० ॥ १ ॥ घरधनी येतील आतां भोजनासी सत्वर घरीं ॥ पाक निष्पती जें त्वरें केली पाहिजे कीं बरी ॥ जिलबी दळ्या मांडे लाडू दूधपाक शिरापुरी ॥ ताताचिया ताटीं जेंवी बैसोनिया बाबाबा ॥ नको छंद० ॥ २ ॥ उगाराहे नाहीं तरी बोलाविते बागुलाला ॥ येरे बागुल ह्मणतां गवरीवरद्वारीं आला ॥ डुगडुग डमरु शिंगी नाद आंगणांत केला ॥ आरूढला नंदीवरी आर्धांगीं तेजगदंबा ॥ नको छंद० ॥ ३ ॥कृष्णासी ते घेउनी कडीये यशोमती द्वारीं आली ॥ होइल जोगियाची दृष्टी ह्मणून भ्याली ॥ लपविला कृष्ण अंचळ पल्लव मुखावरी घाली ॥ भिइल कीं उग्ररूपा देखोनियां लावण्य गाभा ॥ नको छंद घेऊं कृष्णा आला बागुलबुवा ॥ ४ ॥

## २१६ आंबा.

ओंनमोजी गणराया ॥ नमो देवी सारजा मती ॥ द्यावी गुरु राजा ॥ आंबा गातों ॥ १ ॥ ईश्वर ह्मणे पार्वती ॥ ऐकावी निगुती ॥ आंब्याची स्तुती ॥ सांगेन तुज ॥ २ ॥ आंबा शिंपा हो सुंदरी ॥ भावें भक्तीसी निर्धारी ॥ पुण्यपुरुषार्थ हे चारी ॥ येती हाता ॥ ३ ॥ आंबा परम अगम्य ॥ अगोचर तेथुनी विस्तार ॥ अनुपम्य साचार ॥ आंबियाचा ॥ ४ ॥ ॐकार बीजमूळ ॥ महा मायेचें आळें ॥ त्रिगुणीं विस्तारिलें ॥ परब्रह्म ॥ ५ ॥ आंबा कुळवेली वाढत ॥ पुरवितो मनोरथ ॥ तो आंबा त्वरित ॥ शिंपी बोले ॥ ६ ॥ आंबा त्रिआंगीं त्रिगुण ॥ सत्रावी जीवन ॥ पश्यंती ढाळ जाण ॥ तिनाकृती ॥ ॥ ७ ॥ दिसे पवन रविवर्ण ॥ पांचवा आश्वीन ॥ तो आंबा सुजाण ॥ शोभिवंत ॥ ८ ॥ पावलासे सुपती ॥ उपमेसी ब्रह्म मूर्तीं ॥ दशांगें शोभती ॥ आंबीयासी ॥ ९ ॥ आंबा गुणमाया पल्लव ॥ भिन्न भिन्न लाघव ॥ त्यानें आंबा सर्व ॥ झांकुळला ॥ १० ॥ वेद सपुष्पें असे ॥ प्रपंच मूळ दिसे ॥ जन्मोनि मधुरसे ॥ येती हाता ॥ ११ ॥ मुळीं फळ असे ॥ फळीं मूळ दिसे ॥ तो आंबा प्रकाशे ॥ साधुसंगें ॥ १२ ॥ आंबा माय सगुण ॥ न कळे दिसोन ॥ तो आंबा परिपूर्ण ॥ जगदाकार ॥ १३ ॥ आंबा मुळींच न दिसे ॥ त्याचा विस्तार बहु असे ॥

असोनी न दिसे ॥ भ्रांती उणें ॥ १४ ॥ आंबा त्रिभुवनीं वि-
स्तारला ॥ दशदिशा भरला ॥ भरोनी उरला ॥ नेणों किती ॥
॥ १५ ॥ आंबा अचळ अढळ ॥ सदा पुष्पफळ ॥ जगव्या-
पक जगमूळ ॥ जगदाकार ॥ १६ ॥ जग आंब्यामाझारी ॥
आंबा जगाभीतरी ॥ आंबा अभ्यंतरी ॥ सदोदित ॥ १७ ॥
आंबा त्रिकांडी परिकर ॥ अनुहातें भ्रमर ॥ झांकारे गंभीर ॥
नानाध्वनी ॥ १८ ॥ दीप्ती सती नवभक्ती ॥ रिद्धी सि-
द्धी चारी मुक्ती ॥ कोकिळा रूपवंती ॥ शोभिवंत ॥ १९ ॥
तया आंब्याचे छायेसी ॥ सुर नर तापसी ॥ ध्यान धारण
आसनासी ॥ शुभकार्य ॥ २० ॥ साष्टांगीं साधन ॥ योगी
करिती पारन ॥ आंब्याचें हें वन ॥ सर्वकाळ ॥ २१ ॥ आंबा
आज्ञानासी दुरी ॥ सुज्ञानाचे अंतरीं ॥ गुरुचे मंदिरीं ॥ वळलासे ॥
॥ २२ ॥ आंबा माझिया कारणें ॥ आंब्यामाजी जाणें ॥
आंब्यामुळीं राहणें ॥ सोहंभावें ॥ २३ ॥ मूळपीठ अर्धमात्रा ॥
गुरुसी दृढधरा ॥ चुकती येरझारा ॥ चौऱ्यांशींच्या ॥ २४ ॥
प्रभुसंतांचे प्रसादें ॥ आंबा गाइला निजपदें ॥ जाणाजी आ-
नंदभरिते ॥ मिळणी झाली ॥ २५ ॥ संपूर्ण आंबा जाहला ॥
आदीं अंतीं विस्तारला ॥ गुरुमुखें गाइला ॥ सर्व जनीं ॥ २६ ॥

## २१७ बाळसंतोष ४ था.

मी तो परात्पर परदेशी ॥ टाकुन आलों संतांपशीं ॥ को-

णी न ओळखती आह्मासी ॥ वेद देई विदेशांसी ॥ बाबा बाळ संतोष ॥ १ ॥ ध्रु० ॥ द्वय हा तात द्वय तदान ॥ नदे कोरडे कोरान ॥ न गमे नगमे हें साधन ॥ अवीट न विटे परमान ॥ बाबा बाळ० ॥ २ ॥ क्षीर सागरची क्षीरधारी ॥ देह गुळाची गुळवरी ॥ पूर्णपुरी पूर्णपूरी ॥ प्रेम बोध लाडू त्यावरी ॥ बाबा बाळ० ॥ ३ ॥ जीर्ण स्वरूपाचा शेला ॥ कृपेनें देई कां मजला ॥ शुद्ध सत्वाचि करील ॥ ज्ञान बोध उपार्जिला ॥ बाबा बाळ० ॥४॥ प्रपंच रंग भंगी चंगी ॥ हेका दसे आंगीच्या आंगीं ॥ ते तुळे नाचत मी नवरंगीं ॥ रंगीं रंगलों श्रीरंगी ॥ बाबा० ॥ ५ ॥ नवखंडा आखंडिलें ॥ आंगीं जीर्णत्व बांधीलें ॥ जिवीं शिवीं नविसंबिलें ॥ द्यावी भक्तांची कंचोळी ॥ बाबा बाळ० ॥ ६ ॥ नाहीं नाहीं कां गा ह्मणती ॥ पूर्ण भरला आहे जळत ॥ मी ज्ञानार्थ खोदित ॥ अर्थ करी कां समर्थ ॥ बाबा बाळ० ॥ ७ ॥ धान्य घेतां धान्य नसरे ॥ जो घेई त्याचें दरिद्र विखरे ॥ मग तो मागें नवसरे ॥ धान्यदेई कां निर्धारें ॥ बाबा० ॥ ८ ॥ एका जनार्दनीं मागतां दान ॥ शेवीं देईल सुप्रसन्न ॥ देई निज सुख संपन्न ॥ बाबा बाळ संतोष ॥ ९ ॥

## २१८ बाळछंदू.

प्रेम मन डोई झालें मनाचें उन्मन ॥ उपर तिर्थीयेलें ज्ञान

॥ ज्ञान झालें परब्रह्म ॥ बाबा० ॥ ध्रु० ॥ मीनिमिषानिमिष माजी ॥ छंदू ॥ बाळछंदु आहा दूजा ॥ वेगीं येई गरुडध्वज॥ आलिंगन भुजा ॥ क्षेम देईन बाळा ॥ बाळछंदू ॥ २ ॥ तुटली आशेची सांगडी ॥ ज्ञान नेलें पैलथडी ॥ तुटली संसाराची बेडी ॥ क्षणक्षणीं ती नाहीं ॥ बाळ० ॥ ३ ॥जप तप वर्तन सहीत ॥ निवृत्ती होईल निश्चित ॥ समाधी बेसली एक तत्व ॥ मुखीं मात नामाची ॥ ४ ॥ ज्ञान देवा ऐसा छंदू ॥ झाला बाळपणीं पिसा ॥ दान मागतसे ह्मैसा ॥ दशदिशा नमन घाली ॥ ५ ॥ बाळछंदू० ॥ ५ ॥

## फकीर २ रा.

फकीरमस्तानामस्ताना ॥ लालख्यालमों आपना ॥ फ० ॥ ॥ ध्रु० ॥ निराकारकी झोली यारो ॥ निर्गुण माला सेहेली ॥ ॥ फ० ॥ १ निरंजनका फासा ॥ गगन मगनमें उठाया खासा ॥ २ ॥ सच्चा गुरु पीर मेरा ॥ कहे राम नंद कबीरा ॥ फ० ॥ ३ ॥

## २२० फकीर. ३ रा.

गुरुनें आमल पिलायाबे मुजकूं फकीर बनायाबे ॥ गु० ॥ ॥ ध्रु० ॥ मैग्यानके लिया कटोरा ॥ घरघर मांगतहीं टुक्का ॥ मोहो क्रोधकी धुनी जलावें ॥ अनुहत बाजे डंका ॥ गु० ॥१॥ और

हातका लिया पींजरा सोहं पोपट बोले ॥ कहत कबीरा सुनभई साधु अंदरके पट खोले ॥ गुरुनें० ॥ २ ॥

## २२१ फकीर ४ था.

पंच तत्वका बोध करीयो ॥ फकीर भयो भाई ॥ गलासेली हातमों झोली ॥ फ० ॥ १ ॥ गुरुग्यान बिचारें मनचोरे ॥ फ० ॥ आशा छांडसे धीरसोडा ॥ फ० ॥ लौडाग्यानें जुबान पकडा ॥ फ० ॥ काम क्रोधका तोडा झगडा ॥ फ० ॥ हमतो० ॥ २ ॥ सबइंद्रियों कोंडकरियो ॥ फ० ॥ दशइंद्रियें एकध्यान धरीयो ॥ फ० ॥गुरु चरणा हम शीस धरियो ॥ फ० ॥ एका जनार्दनीं स्थिर मन करियो ॥ फ० ॥ हमतो० ॥ ३ ॥

## २२२ मलंगुफकीर २ रा.

मलंगु फकीर ऐसा मलंगु फकीर ॥ ध्रु० ॥ लिया संतनका आसन ॥ खाया गोधन काहे भंग ॥ हमे सदा दंग ॥ ऐसा म० ॥ ॥ १ ॥ लिया संतका दुमाला ॥ मेरा बहुत तुटे जंजाला ॥ एका जनार्दनीं कंगाला ॥ ऐसा मलंगु फकी० ॥ २ ॥

## २२३ कापडी २ रा.

कशिरे विट जोडलीस पुंडलीका ॥ मनीं भाव धरोनियां निका ॥ ध्रु० ॥ मायबापाची सेवा करुनी ॥ विठ्ठल आणिला सखा ॥ १ ॥ खांदी कावडी वाहे पाणी ॥ एकनाथाच्या फुका

॥ २ ॥ भीमा तीरीं रहिवास केला ॥ तुकी उतरला तुका ॥ कशिरे विट जोडलीस पुंडलिका ॥ ६ ॥

## २२४ पद मछिंदर नाथाचें.

नाथ मछींदर आखेले तीर्थबासी उदासी ॥ जुजुरे जुजु॥ राहा भुले आये नाथजी ॥ देखे पद्मीन खाशी ॥ जुजु० ॥ नजानु काहुर बंगाला ॥ भाक्य उनकी दुभासी ॥ जुजु० ॥चाल॥ नाथजी भुले ॥ अंतर खुले ॥ माता जो बोले ॥ भय मत वाले ॥ तोड ॥ काम चोर घात कियारे साईनाथ डुबाया ॥ जुजु० ॥ ॥ १ ॥ पद्मीनसे पुछे नाथजी कौन जात तिहारी ॥ जुजु०॥ पद्मीन कहे सुन जोगीया मैं तो राजकुमारी ॥ जुजु० ॥ काहुर बंगाला इतमों साची द्वाही हमारी ॥ जुजु० ॥ चाल ॥ तुम जोगी सच्चे ॥ केव जात पुछे ॥ जल जीव मच्छे ॥ सब तेरे बच्चे ॥ तोड ॥ जीवन नहीं भया ज्योगीया केवरे खाक लगाई ॥ जुजु० ॥ २ ॥ दुनया मदनकी बनाई पंच कर्दम कीया ॥ जुजु० ॥ एक खडा दुजानहींरे सुनसांई ज्योगीया ॥ जुजु० ॥ कौन जात मेरी कहांवो मैं तो आंगोंकी छाया ॥ जुजु० ॥ चाल ॥ आप आकेले ॥ आप० ॥ साहेब झुले ॥ नयन उजाले ॥ तो० ॥ ज्यात सुनो येक जोगीया दुजी कांहां की माया ॥ जु० ॥ ३ ॥ तेरा मेरा कहना कछु नहीं एक ज्या

ना तिहारी ॥ जु० ॥ मिथ्या बाता सुनो ज्योगिया साची मो-
हनी ठारी ॥ जु० ॥ राजा होना नगरी तुमरी राणी पद्मीण
नारी ॥ जु० ॥ चाल ॥ ज्योग कमाया ॥ सोही गमाया ॥
मोहनी माया ॥ नाथ कमाया ॥ तोड ॥ भाक दीनी मैंतो
चेहरा साच मानो पत्याला ॥ जु० ॥ ४ ॥ सैली सिंगी कंथा
निकाल डारी पथर झोली ॥ जु० ॥ कपरे पेहेरे बांधी पगरी
साची हुवी फकीरी ॥ जु० ॥ जोगी हुवा मस्त दिवाना नैनो
आई अंधारी ॥ जु० ॥ चाल ॥ साधन छुटा ॥ कामने लुटा ॥
मोहचपेटा ॥ धनमानमीठा ॥ तोड ॥ राहा धरमकी बिगारी
ाई पद्मीन प्यारी ॥ जु० ॥ ५ ॥ आलख निरंजन झुठारे
नाथ मछिंदरलुटा ॥ जु० ॥ बारा बरस नाथ जोगीया भोगा
पद्मीन प्यारी ॥ जु० ॥ पुता मेनीनाथ कमाया उसे मोह ल-
गाया ॥ जु० ॥ बारा बारा गाम चौकी कोई आय न पावे
॥ जु० ॥ चाल ॥ पद्मीण प्यारी ॥ पद्मी० ॥ ज्योग बिहारी ॥
मोहनी डारी ॥ तोड ॥ मस्त पद्मीणी सेन माने नाथ हुवे
देवाने ॥ जु० ॥ ६ ॥ सारी पेहनी खुपभरजरी ॥ तंग आंगो-
ी चोरी ॥ जु० ॥ मुलतानी भवया कमानी खासी शोभे नि-
ारी ॥ जु० ॥ नाकोमें नथनी जरतोकी नयन काजर डारी
॥ जु० ॥ चाल ॥ भांगोंमें मोती ॥ चंदर ज्योती ॥ नयन
फेराती ॥ गायन गाती ॥ तोड ॥ मस्त हुवा जोगी दिवा-

ना आप गावे लवाना ॥ जु० ॥ ७ ॥ गहेना बहु तऱ्हा पेनके मस्त बिजली चमके ॥ जु० ॥ जोगी याने नैनासे देखके मन हुवा माशुक ॥ जु० ॥ उनके बार चलना किया रह्या जोगी अटका ॥ जु० ॥ चाल ॥ जोग डुबाया ॥ राज कमाया॥ लगगई माया ॥ प्रीत बडाया ॥ तोड ॥ लटक लगी नाथ दिवाना छूटा मान गुमाना ॥ जु० ॥ ८ ॥ बनबन गोरख धुंडता बुजे सिद्धसो बाता ॥ जु० ॥ कहे कहे मछिंदर गाता मोहे बुजावे ईना ॥ जु० ॥ सिद्ध कहे अवधूता नाथ मछिंदर पूता ॥ जु० ॥ चाल ॥ तेराजी साई ॥ पद्मीन माई ॥ प्रीत लगाई ॥ पुत जनाई ॥ तोड ॥ सिंगल दीपमों जाभाई तुजे राहा बताई ॥ जु० ॥ ९ ॥ सिंगलदीपमें बंगाला राजा कांहुर देश ॥ जु० ॥ पद्मीनसे प्रीत लगाई छोडो ज्यो मदुराशा ॥ जु० ॥ घर बारी होरहे ज्योगिया नधरी किनकी आशा ॥ जु० ॥ चाल ॥ वहां जावें चेला ॥ गुरु अकेला ॥ बंदमोंडाला ॥ तुने निकाला ॥ तोड ॥ करित अंबर भरपावे सिद्ध गुण तेरे गावे ॥ जु० ॥ १० ॥ कानीफा कहे गुरु घर बारीक वनतेरी फकीरी ॥ जु० ॥ दुनयां भोंदी डुबी व्यापारी डुरें पद्मीण प्यारी ॥ जु० ॥ चाल ॥ नाथजी भावे ॥ दंत चुबावे ॥ बोलन पावें ॥ मनमें तिखावे ॥ तो० ॥ क्या कहुंनाथजी पस्ताया मेरा घर डुबाया ॥ जु० ॥ ११ ॥ कानीफा-

कूंकहे अनानाथ हुवा उदासी ॥ जु० ॥ गुरु निंदा करे सोगुसा नयनो सुरज प्रकासा ॥ जु० ॥ राहाचले आये उमासा जीवे जलबिन मासा ॥ जु० ॥ नाथ मछींदरका वासा आयों गोरख खासा ॥ जु० ॥ चाल ॥ चौकीजी वारो ॥ सबकूं पुकारो ॥ आया कान फारो ॥ साच सुमारो ॥ तोड ॥ अंदर ज्योगीया ॥ ज्यावेगा तुम मार खावेगा ॥ जु० ॥ १२ ॥ रयन जोगी जगतां आयो नाथ गोरख पुता ॥ जु० ॥ तंबुरीले धरे गावतां नाच खुबरंग होता ॥ जु० ॥ पखवाजे बेठे अवधूता एकदीन छुपतां ॥ जु० ॥ चाल ॥ रंग जमावे ॥ नाथ रिझावे ॥ रयन जावे ॥ सुरज पावे ॥ तोड ॥ तोबी नाथ कहे गावना लेवो प्रमत नाना॥ जु० ॥ १३ ॥ मुनीजन पखवाज बजावे सुबत मनु झावे ॥ जु० ॥ फेर नाथ तान कहावे नाथ गोरख आवे ॥ जु० ॥चाल॥ रहनेदे भाई ॥ भली भलाई ॥ सब भरपाई ॥ रंग जमाई ॥तोड॥ गोरख साती जोले आवे ॥ आछा नाद जमावे ॥ जु० ॥ १४ ॥ नाथ मछींदर जोगीया चलो गोरख आया ॥ जु० ॥ सुननाथ दुरपाया पुताकीने निभाया ॥ जु० ॥ रहोरे गुनीजन गवैया तुमघर डुबाया ॥ जु० ॥ चाल ॥ गोरखज्यती ॥ लेआये साती ॥ तान सुनाती ॥ बादर जाती ॥ तो० ॥ गुस्सा किया फोडो पखवाज्या निकसे गोरख सिद्धा ॥ जु० ॥ १५ ॥

## २२५ रहाट दुसरा.

माझा रहाट ग बाई साजणी ॥ गातों चवघीजणी ॥ ध्रु० ॥ माझ्या रहाटाचा बाई कणा ॥ माझ्या चवघीजणी सुना ॥ तुह्मीं शेता कांग जाना ॥ हुरडा लोंबी कांग खाना ॥ तुह्मी बळेंच झोंबीकां घ्याना ॥ गबाई साजणी ॥ गातों० ॥ १ ॥ माझ्या रहाटाचें बाई चाक ॥ माझा पती मोठा हटघाट ॥ मारली ढुंग मधीं लाथ ॥ पडलें उंबरठ्याचे आंत ॥ पडले पुढले दोनी दांत ॥ गबाई साजणी ॥ गातों० ॥ २ ॥ माझ्या रहाटाची बाई फळी ॥ माझी सासु मोठी खेळी ॥ माझी नणंद मोठी पळी ॥ गबाई साजणी ॥ गातों० ॥ ३ ॥ माझ्या रहाटाची बाई माळ ॥ माझें तांबडें लुगडें लाल ॥ माझ्या कडेवर तानें बाळ ॥ माझें मोतीं देतें ढाळ ॥ गबाई साजणी ॥ गातों० ॥ ४ ॥ माझ्या रहाटाची बाई बुडकुली ॥ घरधन्यानें बाईल कुटली ॥ शेजारणीची शेळी सुटली ॥ धक्या सरसी घागर फुटली ॥ गबाई साजणी ॥ गा० ॥ ५ ॥ माझ्या रहाटाचा खांबला ॥ माझ्या पतीपुढें कांबळा ॥ शेजाऱ्याच्या पोरांनु बोंबला ॥ गबाई साजणी ॥ गातों० ॥ ६ ॥ माझ्या राहाटाची बांधव ॥ गणेश ह्मणे एकदां पंढरीसी जावें ॥ एकदां विठ्ठल पहावें ॥ गबाई साजणी ॥ गातों० ॥ ७ ॥

## २२६ पिंजरा.

प्रथम नाद बिंद मिळवणी होता एकांतर ॥ तेंच भाळीं विधीचें अक्षर ॥ पंधरा दिवसीं उदबुद जळीं तुरंग जैसा फिरे ॥ होय मासा गोळंकार ॥ दुसरे मासीं आंडकार पिंजऱ्याची उभावणी ॥ तिसरे मासीं शिर मांडणी ॥ १ ॥ तन पिंजऱ्यामध्यें मनराघोबा बोले मंजुल वाणी ॥ धन्य कारागिर निर्गुण धनी ॥ ॥ ध्रु० ॥ चवथे मासीं चार देह तयार जाहल्या पुन्हां ॥ पांचवे मासीं तत्व संपूर्ण ॥ हस्तपाद फुटती सावे मासीं झालें षड्गुण ॥ सातवे मासीं संचरे प्राण ॥ आठवा नववा दोन्हीं होती जिवा बहुत जाचणी ॥ जपतो सूर्य मंत्र निशिदिनी ॥ तन पिं० ॥ २ ॥ गर्भबंध तुटला सुटला प्रसूतिचा वारा ॥ गर्भ येउनी बसला द्वारा ॥ तेथें उगवला ह्मणे मजला सोडीं परमेश्वरा ॥ तुजला न विसरूं दातारा ॥ बाहेर गेला विसरोनि आला लागे कुळस्मरणीं ॥ भुलला मायेसी पाहुनी ॥ तन पिं० ॥ ३ ॥ औट हाताचा पिंजरा केला धन्य ते कारागिर ॥ चतुर्दश खणांचें मंदिर ॥ त्रिगुणाचें कांबीट बैठक राघोची त्यावर ॥ संत खुण जाणती करार ॥ अशी उभवणी केली पिंडाची पहात्या आपकर्त्यानीं ॥ दास लागे संतांचरणीं ॥ तन पिंजरा० ॥ ४ ॥

## २२७ कुडीचावआत्म्याचा संवाद.

कुडी ह्मणे आत्म्याला नका टाकुन जाऊं स्वामी मजला ॥ कुडी० ॥ ध्रु० ॥ तुझीनमाझी बाळपणाची बहुप्रीत ॥ बसून दोघे पिंजऱ्यांत ॥ आतां कसें कां केलें चंचळ चित्त ॥ ओढावलें संचित ॥ आत्म्या तुझा कळेना मज अंत ॥ जातोस वैकुंठांत ॥ आतां कधीं पडशील माझ्या डोळां ॥ कुडी० ॥ १ ॥ आत्मा ह्मणे वचन ऐक कुडी ॥ तुझी न माझी जोडी ॥ अंतर पडला नाहीं अर्धघडी ॥ पुढें गेले हो गडी ॥ आह्मां जाणें आहे बहुत तांतडी ॥ तुटली मायेची बेडी ॥ आगलागो रे या संचिताला ॥ कुडी० ॥ २ ॥ कुडी ह्मणे तूं माझा मन मोहन ॥ जातोस पिंजऱ्यांतून ॥ मी परदेशी बैसल्यें होऊन ॥ अंतीं मला नाहीं कोण ॥ भाववस्ता भोगिल्या हौसेन ॥ सोन्याचें कंकण ॥ मजवर तुटून पडलें गगन ॥ कडाडलें अस्मान ॥ आतां भेटूं गळ्यासीं लावूंगळा ॥ कुडी० ॥ ३ ॥ कुडीला कोठें दिलाहो जानवसा ॥ मसणपुर गांव खासा ॥ तेथें भाव माहार नांदे खासा ॥ त्रैलोक्यामध्यें ठसा ॥ आत्मा पाहतो कुडीचा तमाशा ॥ हिंडतो दाही दिशा ॥ जैसा गळ ओढोनी घेतो मासा ॥ होता कासाविस ॥जेथून आला हो तेथें गेलाहो ॥ कुडी० ॥ ४ ॥ मैनाका रुसली

तूं मजवर ॥ मी परदेशी नर ॥ हात जोडुनी उभा तुजसमोर ॥ नको होऊं दिलगीर ॥ तुजला भाऊबंद अवघे सारे ॥ साह्य करतील फार ॥ तूं या मृत्युलोकींची राहणार ॥ मला जाणें आहे दूर॥ एकवीस स्वर्गांवरती माझें घर ॥ अवघ्यांला महासूर ॥ विष्णुदास गातो किंकर ॥ संतांचा पामर ॥ नकोरे विसरूं गुरूच्या चरणाला ॥ कुडीह्मणे आत्म्याला ॥ नका० ॥ ५ ॥

## २२८ गस्त दुसरा.

उठाजी मायबाप कसी लागली झोंप ॥ हुजुर जाउनियां येवढी चुकवा खेप ॥ ध्रु० ॥ रात्रंदिवस तुह्मी सावध असा ॥ तुमच्या नगरीचा नाहीं आह्मां भरवसा ॥ उजेड पडतांना गळा पडेल फांसा ॥ तुमची नांदणुक आह्मां दिसे ना बरी ॥ तुमचे शेजारीहो एक मुळवादकरी ॥ २ ॥ हिंडतां देशांतरी लक्षचौऱ्यांशीं जागा ॥ आजून आठवेना आलामृळच्यामार्गा ॥ माहाराच्या बोलण्याचा तुह्मां येईल राग ॥ ३ ॥ मागल्या ठेवण्याचा कांहीं ऐवज काढा ॥ त्याचे सत्तेनें आह्मी बोलूं घडघडा ॥ 'एका जनार्दनीं' धरा बळकट मेंढा ॥ उठाजी मायबाप० ॥ ४ ॥

## २२९ गाय.

आशा मनशा ह्मा ओढाळ भारी ॥ हिचें दुभतें घरोघरीं ॥ सिद्ध

साधकांवेडेकरी ॥ हिणें मोहिले ब्रह्मचारी ॥ येक ह्मणे रे गोवळा ॥ गाई वळू जाणें तो निराळा ॥ध्रु०॥ गाय हिंडे जनीं वनीं॥ हिसीं चोळी ऐसा नाहीं कोणी ॥ तुह्मीं लटकें ह्मणाल जनीं ॥ हिणें ठकविलें देव तिन्हीं ॥ येकह्मणेरे० ॥ १ ॥ गाय वतरूनी ईश्वरापाशीं ॥ दोनीं शिंगें लाविली कुशीं ॥ तप ढाळी अर्धक्षणमात्रेसी ॥ रतकेला तोभिल्लिणीसी ॥ येकह्मणेरे०॥ २ ॥ विष्णुकुजट होउनी माये ॥ तंवतोगाई भोंवतीधावे ॥ गायी तयाभोंवती भोवे ॥ बळीच्याद्वारें लाविली सवें ॥ येकह्म० ॥ ३ ॥ गाई लागली इंद्रामागें ॥ त्याच्या सर्वांगीं पडलीं भगें ॥ चंद्र कलंक ईच्यायोगें ॥ अहिल्या पाषाण पतन त्यासंगें ॥ येकह्मणे रे० ॥ ॥ ४ ॥ रावणानें पाळितां इसी ॥ वेड कैसें तें लावियेलें त्यासीं ॥ तरीही लागी तोंडवासी ॥ त्याचें सर्व कुळनाशी ॥ येक ह्म० ॥ ॥ ५ ॥ दुर्योधन घालितां हात ॥ तिनें परतोनी मारिली लाथ ॥ दांत विचकून पाडिला रणांत ॥ केला सहकुटुंबाचा घात ॥ येक ह्म० ॥ ६ ॥ गाई लागली शुकापाठीं ॥ तिनें केली तयासी बहु दाटी ॥ त्यानें परतोनी मारिली काठी ॥ नेउनी घातली गिरी कपाटीं ॥ येकह्म० ॥ ७ ॥ हृदयीं ग्रंथावरूनी सोडविली ॥ नाम देवें करीं धरियली ॥ देखोनी मुक्ताई हांसली ॥ येक०॥ ८ ॥

## २३० पद छंद.

असा धरी छंद जाई तुटुनियां भवबंध ॥ ध्रु० ॥ छंद ला-

गला टिटविला ॥ तिणें समुद्र आटविला ॥ मैनावतीनें कृतार्थ केला ॥ गोपीचंद ॥ जाई० ॥ १ ॥ झाले तीन जन्म भरताला ॥ रावण रामरूपी तो झाला ॥ गोपी चढल्या वैकुंठाला ॥ यशोदानंद ॥ जाई० ॥ २ ॥ छंद असाध्य विसाध्य ती ॥ छंदें नर नारायण होती ॥ जो त्रिजग आपुला करिती ॥ जो सुखकंद ॥ जाई० ॥ ३ ॥ दुधाची वाटी उपमन्युला ॥ अढळ पदीं ध्रुव बैसविला ॥ मार्कंडेय छळिता झाला ॥ या मती मंद ॥ जाई० ॥ ४ ॥

## २३१ चिन्मयकंकण.

धन्य सद्गुरु कारागिर हा देखिला नयनीं ॥ चिन्मय कंकण लेवुनि मजला नेलें निज भुवनीं ॥ अनंत जन्मींचें सुकृत बाई होतें मम पदरीं ॥ अवचित गांठ पडली त्यानें धरिलें मजकरीं ॥ सन्निध बैसोनी दृष्टी न्याहाळी पद्महस्त शीरीं ॥ ठेवुनि गुरुनाथ दावी नवल सुरी ॥ सुरी श्रवणीं पेरिलें नयनीं उगवलें काय सांगूपरी ॥ स्वात्म स्वरूपीं मनवेधलें निमग्न अंतरीं ॥ भक्ति हाळद आंगीं मर्दुनी प्रेमगळसरी ॥ सौभाग्याचें भाळीं कुंकूं लाविपलें शीरीं ॥ छंद ॥ घातलें जनांजन मम नेत्रीं ॥ श्रवणीं अनुभव बुगडी मळसूत्री ॥ लागलें ध्यान अखंड सुमंत्री ॥ भाव बिजवरा दयासरी ही स्वधर्म

तनमणी ॥ तऱ्हेतऱ्हेचें भूषण मजला दिधलें साजणी ॥ धन्य० ॥ १ ॥ ऐक साजणी औट शिखरीं देखिली कळा ॥ शांती ठुसी विवेक टीका दिसे दिव्य गळा ॥ अक्रोधाचें पदक जडित फांकली कळा ॥ अधम चिंचपेट्या ऐसी शोभे बोर माळा ॥ जीत इंद्रियाचे काप कानीं दिसे चंद्रकळा ॥ क्षेमचुडा दम पाटली बोध टिकली भाळा ॥ सत्य पुतळी अनुभव सुतीं गुंफिली माळा ॥ साक्षात्कार माणीकमोतीं तेज झळाळा ॥ छंद ॥ यम नेमहे तोडे तोडर ॥ दम तितिक्षा जोडवी पोल्हार ॥ उपरती विचवी विरोदी सुंदर ॥ निरापेक्ष पुतळी आनंद हार ॥ निर्वैर केतक शिरीं बिराजित चंद्रकोर वेणी ॥ क्षेमराखडी पूर्ण भूद दिधली श्रीगुरुनीं ॥ धन्यस० ॥ २ निर्गुण पुरींचा सद्गुरु जोहा देखिला नयनीं ॥ जडाव कोंदण मजला दाखविलें त्यांनीं ॥ श्रद्धा मोती गुंफोनि जाळी मस्तकीं रेखूनी ॥ समाधी मोहन माळा दुल्लडी झळके उन्मनी ॥ चहुं पुरुषार्थे करीं मुद्रिका चमके चांदणी ॥ श्रवण मनन निजध्यास सुंदर शोभे फुल वेणी ॥ शुद्ध सत्व हातींची कंकणी शोभे बहु गुणी ॥ महावाक्याच्या पंखे बाळ्या ल्यालें मी श्रवणीं ॥ छंद ॥ शुद्ध मती बाजुबंद कंकण ॥ चंद्रहार हा परमार्थ जाण ॥ निरहेतु हें अलंकार पूर्ण ॥ लेवूनी सद्गुरुचे चरणीं मी लीन ॥ जन्म मरण भ्रांती पडली गेली निरसोनी ॥ निश्चळ निवांत

होउनि रतलें गुरुचरणीं ॥ धन्य सद्गुरु० ॥ ३ ॥ ऐसें अपार लेणें मजला सद्गुरुनें लेवविलें ॥ द्वैतभयानें दूर सारोनी निजपद दाखविलें ॥ देह चतुष्टय पिंडब्रह्मांडाहुनी वेगळें केलें ॥ पंचभूतें आणि त्रिगुण विषयसहज निरसिले ॥ उन्मनी शेजे जाउनी बाई सुखें पहुडलें ॥ शुद्ध तेज पाहुनी मन हें आत्मपदीं रमलें ॥ सद्गुरुनाथें दयाकरोनी अनिर्वाच्य केलें ॥ काय होऊं उतराई तयाची जीवन्मुक्त झालें ॥ छंद ॥ धन्य धन्य ती सद्गुरु माउली ॥ दिनवत्सावर वरसोनी आली ॥ माझी मजला वस्तु दावीली ॥ मुक्तिवरली भक्ती मज दिधली ॥ लेवुनी भूषण कृष्णकिंकर रतला गुरुचरणीं ॥ त्वंपद तत्पद सारोनि असीपदीं रमलों आनंदानीं ॥ धन्यस० ॥ ४ ॥

## २३२ जन्ममूळपत्रिका.

जन्ममूळपत्रिका सांगतों घ्यावी ऐकून ॥ श्रोत्या होई सावधान ॥ ध्रु० ॥ ॐकाराची माया नेमिली अमृताची खाण ॥ मायारे रसाळ त्रिगुण ॥ गज अंकुश तुझें बाळक कथिलें पुराण ॥ कथा चाळवी पुढें ज्ञान ॥ चैत्रमासीं न्हाण आलें विधवा प्रमाण ॥ वैशाख मासीं बहुधन ॥ जेष्ठमासीं पाळव आला रोग निर्माण ॥ दिनभर कामा जपून ॥ आषाढ मासीं पाळव आला भरत वांझहीन ॥ ऐसें होणार प्रमाण ॥ श्रावण

मासीं पालव आला उत्तम तो फार ॥ सुंदर काय सकुमार ॥ भाद्रपद मासीं पालव आला तिला तोंड फार ॥ सुंदर काय सकुमार ॥ तिचा धड नाहीं संसार ॥ आश्वीन मासीं नाहण पावशीं वैरागिन थोर ॥ नार काय मनामध्यें झुरे ॥ कार्तीक मासीं पालव आला भाग्यवंत नार ॥ नाहीं भाग्यासी अंतपार ॥ मार्गशीर्ष मासीं पालव आला पीडावंत फार ॥ तिचा काय जर्जर भ्रतार ॥ पौष मासीं पालव आला झाला शून्याकार ॥ माहीचा पुत्र शोक फार ॥ फाल्गुन मासीं पालव आला लक्ष्मीचा गुण ॥ सरले बारा महिने ॥ सात वार ऐक चातुरा रविचा प्रकार ॥ पुत्र घातकी होइल नार ॥ सोमवार उत्तम शिवाचें न्हाण नाहीं बरें ॥ मरण पावेल तिचा भ्रतार ॥ मंगळवारीं नहाण सुंदरी ऐका होणार ॥ आत्म घातकी होइल नार ॥ बुधवाराच्या कन्या होतिल ऐसा निर्धार ॥ जन्म देखिला ऐक चातुर ॥ शुक्र नाहण याचप्रमाणें उत्तमता फार ॥ पतीचें राज्य करील थोर ॥ असें शनवारीं ती पर द्वारीं सुंदर कामीन ॥ सरले सात वार येथून ॥ २ ॥ पंधरा तिथी यांची गणती सांगेन तुह्माला ॥ ऐक पंडिता दाखला ॥ प्रतीपदेस जन्मदेखिला मरण भ्रतार ॥ बीजेचा शोक करीनार ॥ ॥ त्रितीयेचें नाहण देखिलें जन्म करण कर्णाराला ॥ पुत्र कन्यांचा लाभ झाला ॥ चवथीचें न्हाण येईल नेमुन सां-

गेन तुह्माला ॥ पतिव्रतेचे सगुणगुण तीला ॥ पंचमीचें फळ आदी होणार पाहें दाखला ॥ षष्ठीवर विकार जन्म दिला ॥ सप्तमीचा पालव पुत्राचा नेमनेमिला ॥ दरिद्री गुण असे अष्टमीला ॥ नवमीचें नहाण येईल नेमुन सांगेन तुह्माला ॥ ऐक पंडिता दाखला ॥ आणि दशमीचें नहाण विकसी जन्माची कानी ॥ तुह्मीं बसला ऐका ज्ञानी ॥ येकादशीस जन्म पाहिला सुंदर त्रिभुवनीं ॥ तिचें पर पुरुषावरी ध्यान ॥ द्वादशीस पालव आला पद्मिण बहुगुणी ॥ अशी विरळा सांगेल वचन ॥ त्रयोदशीसी पालव आला पद्मिण बहुगुणी ॥ तीतर अखंड सौभागिनी ॥ चतुर्दशीसी चतुर चंचळा भ्रमर तिचे नयनीं ॥ लक्षितां दिवस अस्तमानीं ॥ अमावास्या पौर्णिमेचें नहाण ॥ दारीद्री पालवाचे गुण ॥ सरल्या पंधरातिथी एथुन ॥ बळवंत राव अभंग नांव राहतो करवीरापाशीं ॥ नौबद चौघडा दक्षिणदेशीं ॥ ज० ॥ २ ॥

## २३३ रामजन्माचें व मारुतीजन्माचें पद. ५९

महाराज रामचंद्रहो ॥ चंद्रा श्रीहरी महिमा तुझी पंढरपुरीं रामचंद्रहो ॥ ध्रु० ॥ महाराज दशरथ राजाहो ॥ राजा भूपती स्त्रिया तिघी त्यांला असतीहो पुत्र फळनाहीं ॥ नाहीं निश्चितो यज्ञ केला ऋषीहातीं जपलामंत्रहो ॥ चाल ॥ महारा-

ज जपला मंत्रहो ॥ तीन पिंड केले त्वरीत हो ॥ निर्माण केलें पवीत्रहो ॥ तोड ॥ ठेविले तिघींतें तीनकरीं ॥ तिनें भक्षावें सत्वरी ॥ रामचंद्रहो ॥ चंद्राहो श्रीहरी महिमा० ॥ १ ॥ महाराज घार एक फिरेहो ॥ फिरे आकाशीं होणार गती नकळे कोणाशीं ॥ झडपमारिलीहो ॥ मारिली पिंडाशीं पिंडनेला गगनाशीं ॥ कैकइचाहो ॥ चाल ॥ महाराज कैकइचाहो ॥ त्यामध्यें जन्ममारुतीचाहो ॥ तोड ॥ सोडिला अंजनीकरीं ॥ तिनें भक्षीला सत्वरी ॥ रामचंद्रहो ॥ चंद्राश्रीहरीमहिमा० ॥ २ ॥ महाराज दोघींचें हातींहो ॥ हातीं दोनीपिंड चिंतापडली अखंड त्रिभाग केलाहो ॥ केले तीनपिंड ॥ तिघींचेकरीं तीनपिंड पुत्र जन्मती राजपिंड ॥ लावितील लंकेवरी ध्वज ॥ रामचंद्र हो ॥ चंद्राश्रीहरीमहि० ॥ ३ ॥ महाराज राम कौसल्याहो॥ कौसल्येचे उदरीं ॥ जन्माआले श्रीहरी ॥ चैत्रशुद्धनवमीहो ॥ नवमीचे दिवशीं राम आले जन्माशीं ॥ आनंद झाला हो झाला आयोध्येसीं ॥ राजा दशरथाचेवंशीं ॥ पुत्र जन्मलेहो ॥ चाल ॥ महाराज पुत्रजन्मलेहो ॥ श्रीराम लक्ष्मणहो ॥ भरत आणि शत्रुघ्नहो ॥ ऐसे बंधु चौघेजणहो ॥ तोड ॥ हे जन्मले हृषीकेशी राजादशरथाचे वंशीं ॥ रामचंद्रहो ॥ चंद्राश्रीहरी महिमा० ॥ ४ ॥ महाराज शुद्धपौर्णिमाहो ॥ पौर्णिमेचे दिवशीं मारुती आले जन्मासी ॥ कृष्ण वर्ण पहा हो ॥ चाल ॥ महा-

राज कृष्णवर्ण पहाहो ॥ पंढरीचामार्ग सोपाहो ॥ तुळसीच्यामाळा गुंफाहो ॥ हातीं घेउनी अबीर बुकाहो ॥ तोड ॥ नाचा रंग शिळेवरी ॥ भेटदेईगामुरारी ॥ रामचंद्राहो श्रीहरी ॥ महिमा तुझी पंढरपुरीं ॥ रा.म० ॥ ९ ॥

## २३४ चोळी.

अनुभवचोळी भिंगाची ॥ गुरुनें दिली मज हौसेची ॥ अनु० ॥ ध्रु०॥ निर्गुणपुरीचें सुत बारिक फार ॥ नाहीं दृष्टीचा वेव्हार ॥ त्रिगुण मैतो पाणीचा आकार ॥ वरती रंग तुरेदार ॥ पंचभूतात्मा आत्माशरीर ॥ खण उतरले मनोहर ॥ पहाचतुराई कारागिराची ॥ खंडणी स्थूळवैराटाची ॥ अनुभव० ॥ १ ॥ फाडकन बेतून बेतुनचोळी ॥ पीतरंगाची झळाळी ॥ सुंदर शिवण सुंदर मोत्यांची जाळी ॥ जणू काय सूर्य प्रभाकवळी ॥ उगवला चंद्र चंदनीच्या जवळी ॥ तेज फांकलें अंतराळीं ॥ अनुभव० ॥ २ ॥ लहान चौकडी चौकडी चौकडी सूक्ष्म ॥ देखे अंगुष्ठा समान ॥ लालरंगाचा कांठ अनुपम्य ॥ वरती रंग शुद्धश्याम ॥ सुनीळ वर प्रभा महाकारणाची ॥ आंतमध्यें मूर्ति श्रीरंगाची ॥ अनुभव०॥ ३ ॥ जेथें वृत्ति झाली झाली समाधान ॥ जीवशिवासी एक लग्न ॥ वाजती वाद्यें वाद्यें हीं दोन ॥ ओळख नाथाची खूण ॥ राज्ययोगीचें योगीचेंसाधन ॥ सांग ज्ञान अज्ञान ॥ उघडली

दृष्टी खुणाही दाता साची ॥ सेवा संतांचे घरची ॥ अनुभ-चोळी० ॥ ४ ॥

## २३५ कानोबा.

तेरे तेरे तें कानोबा तेरे तेरे तें ॥ पहिलें कोठेंच नव्हतं कांहीं ॥ चंद्र सूर्य तारा नाहीं ॥ अवघें शून्यच होतें पाहीं । कानोबा तेरे तेरे तें ॥ १ ॥ तेथें एक ढालगज निर्माण झाली॥ तिणें पहा येवढी ख्याती केली ॥ इंद्रादिकांस ह्मणे बाहुली ॥ अमरपुरीं तिची घरकुली ॥ कानोबा० ॥ २ ॥ ती मूळची कर्ण-कुमारी ॥ तिचा बापतो ब्रह्मचारी ॥ तो जन्मला जियेचे उदरीं ॥ ऐसी पाहतां नवलपरी ॥ कानोबा० ॥ ३ ॥ तिनें बापची दादला केला ॥ कोण वाईट ह्मणे या बोला ॥ अवघे तिचे चालणें चाला ॥ तरी कैवल्य सुख तुह्माला ॥ कानोबा० ॥ ४ ॥ तो तियेशीं शिवला नाहीं ॥ वांझ गाभिण झाली पाहीं ॥ व्याली पांच पंचवीस पोरें तेही ॥ ऐसी तियेची नवलपरी ॥ कानोबा० ॥ ५ ॥ ऐसी व्याली ती सकळ सृष्टी ॥ न पडत भ्रताराचे दृष्टी ॥ रामदास ह्मणे या गोष्टी ॥ विचारा सद्गुरुच्या मुखीं ॥ कानोबा तेरे तेरे तें ॥ ६ ॥

## २३६ तनकायेचापिंजरा.

तनकायेचा पिंजरा केला आंत बैठक राघूची ॥ धन्य का-

रागिर करणी त्याची ॥ ध्रु० ॥ कोणी कर्त्यानें कर्णी केली नि-र्गुणाचा सुतार ॥ पहिलेमासीं केला आकार ॥ तन० ॥ १ ॥ रज शिळेसीं पाया घातला खांबकरार ॥ दुसरे मासीं झाला बिंबा-कार ॥ तन० ॥ २ ॥ तिसरेमासीं त्रिगुणवेळा पिंजऱ्याचा सु-मार ॥ सभोंवते साठ तीनशें फेर ॥ तन० ॥ ३ ॥ चवथेमासीं चौसष्टकळा आकारल्या साधुनी ॥ वरती चर्माची गवसणी ॥ तन० ॥ ४ ॥ पांचवेमासीं पांचातत्वांची केली मिळवणी ॥ त्यावरी सांदे दिले जडवुनी ॥ तन० ॥ ५ ॥ साहवेमासीं स-गुणरूपाशीं चौक्या बसविल्या त्यानें ॥ बंदोबंदीं खिळे दिले ठोकोनी ॥ तन० ॥ ६ ॥ सातवेमासीं सप्तसागर वाहती शि-रसीर ॥ तयांचे उफराटे पाझर ॥ तनका० ॥ ७ ॥ आठवे मासीं अष्ट पाकुळका आकारल्या सत्वर ॥ पिंजरा झालासे तयार ॥ तनका० ॥ ८ ॥ नववेमासीं नऊसुरके आकारले करार ॥ बैठक राघूची त्यावर ॥ तनका० ॥ ९ ॥ दाहवा सु रका गुप्तचि बिकट वाट त्रिगुणींची जाण ॥ गुरुमुखें घेई ओळखून ॥ तनका० ॥ १० ॥

## २३७ वैद्य.

याया सद्गुरुचा गुण मज आला ॥ भवरोग निघोन गेला ॥ ध्रु० ॥ संचित उदयकाळीं आला ॥ पुढी देउनी गेला ॥ देह

नाडीचा शोध केला ॥ मळ अवघा गेला ॥ ज्ञान रसायण देउनी सत्वर ॥ विज्ञानानळ प्रदीप्त केला ॥ या० ॥ १ ॥ सोहं मुळी चारसहा घेणें ॥ शमदम अनुपानें ॥ वैराग्य भक्तिपंथ करणें ॥ गुण येईल तेणें ॥ नित्य नित्य वेग विचारें ॥ अनुदिनी मग सेवीत जावें ॥ या० ॥ २ ॥ अर्धमात्राही चिंतामणिची ॥ दिली एक लक्षाची ॥ सुरे प्रमाण घ्यावी साची ॥ मुखीं येइल रुची ॥ नारायण सुत सेवी निरंतर ॥ फिटली चिंता भवरोगाची ॥ या० ॥ ३ ॥

## २३८ जांतें ( दळण. )

येईहो कानाई मी दळीन एकली ॥ एकली दळितां शिणले हात लावीं वहिली ॥ धृ० ॥ वैराग्य जांतें मांडूनी ॥ विवेक खुंटा थापटोनी ॥ अनुहात दळण मांडूनी ॥ त्रिगुण वैरण घातलें ॥ येई० ॥ १ ॥ स्थूळसूक्ष्म दळीयेलें हरीकारणासहीत ॥ महाकारण दळीयेलें औटमात्रासहीत ॥ येई० ॥ २ ॥ दशा दोनी दळीयेल्या द्वैतअद्वैतासहीत ॥ याही व्यापक दळीयेलें अहँ सोहं सहीत ॥ येई० ॥ ३ ॥ एकवीस स्वर्ग दळीयेले चवदा भुवनासहीत ॥ सप्तपाताळांदळीयेलें सप्तसागरासहीत ॥ येई० ॥ ॥ ४ ॥ बारासोळा दळीयेल्या सत्रावीसहीत ॥ चंद्रसूर्य दळीयेले गणासहीत ॥ येई० ॥ ५ ॥ नक्षत्र वैरण घालुनी नवग्र-

हांसहीत ॥ तेहेतीस कोटी देव दळियेले ब्रह्माविष्णूसहीत ॥ येई० ॥ ६ ॥ ज्ञानअज्ञान दळीयेलें विज्ञानासहीत ॥ मीतूंपण दळीयेलें जन्ममरणासहीत ॥ येई० ॥ ७ ॥ ऐसें दळण दळीयेलें दोनीनळ्यांसहीत ॥ एकाजनार्दनीं दळीयेलें कांहीं नाहीं उरलें ॥ येई० ॥ ८ ॥



# जाहिरखबर.



अनेक प्रकारचीं पुराणादिक विषयांचीं व धर्मसंबंधी विषयांचीं पुस्तकें; व्याकरणें, काव्यें, नाटकें आणि शालोपयोगी संस्कृत, मराठी, व गुजराथी पुस्तकें स्वल्प किमतीनें आह्मांकडे विकत मिळतात.